ग्रंथांक १.

# श्रीमन्मध्वचरित्रामृत.



लेखक व प्रकाशक

रामचंद्र हयग्रीव मणूरकर

हेडमास्तर सरकारी मराठी शाळा

राज्यदेवास—सीनियर.

प्रकाशक

श्रीमन्मध्वसिद्धान्तप्रचारिणीसभा—सदाशिव पेठ,

घर नं० ८१९ पुणें शहर.

आवृत्ति १ ली.

शके १८३८, सन १९१६.

किंमत १० आणे.

श्रीमन्मध्वमतप्रचारिणीसभेमार्फत प्रसिद्ध होणारी ग्रंथावली—

ग्रंथांक १.

# श्रीमन्मध्वचरित्रामृत.

लेखक व प्रकाशक

रामचंद्र हयग्रीव मणूरकर

हेडमास्तर सरकारी मराठी शाळा

राज्यदेवास–सीनियर.

प्रकाशक

श्रीमन्मध्वसिद्धान्तप्रचारिणीसभा—सदाशिव पेठ,

घर नं० ८१९ पुणें शहर.

आवृत्ति १ ली.

शके १८३८, सन १९१६.

किंमत १० आणे.

# अनुक्रमणिका.

—-***——



———

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ९ | १८ | विहितसत्कमा | विहितसत्कर्मा |
| ११ | २३ | आविधियुक्त | विधियुक्त |
| १२ | १३ | श्रीमव | श्रीमध्व |
| ५ | १५ | निर्गूढ | निगूढ |
| ८ | १२ | वायूदेव | वायुदेव |
| ९ | १३ | एवढी तेवढी खातां | एवढी तेवढी न खातां |
| ९ | २२ | अंकुरोद्ध | अंकुरोद्भव |
| १० | २१ | मध्यगेहभटांच्या | मध्यगेहभट्टांच्या |
| ११ | १९ | कूडुवरच्या | कूडुवूरच्या |
| १२ | १३ | कूडुवरचा | कूडुवूरचा |
| ३६ | १ | कजव्यानजीक | कसब्यानजीक |
| ४२ | ११ | विषद | विशद |
| ४९ | ५ | आढियाजगन्नाथ | ओढियाजगन्नाथ |
| ५२ | ६ | अध्यात्मरामायणांत | वासिष्ठरामायणांत |
| ५३ | ३ | अध्यात्मरामायणे | वासिष्ठरामायणे |
| ६९ | १३ | प्रत्यत्न | प्रयत्न |
| ७३ | १४ | कंबलिकां | कवलिकां |
| ७३ | १८ | ह्याह्वयेच्छासि | त्वाह्वयेच्छासि |
| ७४ | १० | उध्वत | उध्वस्त |
| ७५ | १४ | प्रपलायनमलत: | प्रपलायनमत्र नः |
| ८० | ७ | सारूप | सारूप्य |
| ८३ | २ | अक्षोभ्यतीर्थ | अधोक्षजतीर्थ |
| ९२ | ६ | पद्मनाभ | पद्मनाभतीर्थ |
| ९४ | ७ | मवनवमी | मध्वनवमी |

शक्य तितक्या बारकाईनें पाहून हें शुद्धिपत्र तयार केलें आहे. तथापि नजरचुकीनें आणखी कोठें दोषस्थलें राहून गेलीं असतील तर तीं वाचकांनीं आम्हांस कळविल्यास पुढील आवृत्तींत तीं आम्ही दुरुस्त करूं.

# चरित्रलेखकाचे दोन शब्द.



सत्पुरुषांची कथा म्हटली म्हणजे अत्यद्भुत आनंद देणारी केवळ कामधेनुच होय असें महाराष्ट्र महाकवि मोरोपंत यांनीं म्हटलें आहे तें अक्षरशः खरें आहे. ह्या त्रिगुणात्मक संसारांतून सज्जीवांच्या उद्धारासाठीं प्रवृत्त झालेल्या वेदान्तशास्त्ररूपी महासागरांत निमज्जन करून ज्यांनीं सत्सिद्धान्तरूप अनर्घ्य मौक्तिकें काढिलीं त्या श्रेष्ठ विभूतींत अग्रपूजेच्या सन्मानास श्रीमज्जगद्गुरु मध्वाचार्य हे पात्र झाले आहेत. तत्त्वज्ञानांत यांच्याइतक्या उच्च दर्जाच्या अवतारी पुरुषाचा शोध करूं गेल्यास असा दुसरा पुरुष सांपडणें अशक्य आहे. अज्ञानांधकारांत चांचपडणाऱ्या जीवांना ज्ञानदीप दाखवून मौक्तिक आनंदाचा अनुभवलाभ घडवून देणाऱ्या ह्या पुरुषपुंगवाचें मराठींत विस्तृत असें चरित्र नसावें ही आश्चर्याची व खेदाची गोष्ट होय! नाहीं म्हणावयास माझे पहाण्यांत आजपर्यंत रा. रा. कृष्णाजी आचाजी गुरुजी (धारवाडच्या माजी 'कालिदास' पत्राचे संपादक) आणि सातारचे पंडित द्वैतवेदान्तभूषण नरसिंहाचार्य बाळाचार्य गजेंद्रगडकर या उभयतांनीं लिहिलेलीं दोन त्रोटक चरित्रें मात्र आलीं. इंग्रेजींत एक "Madhwa and Madhwism" नांवाचें मद्रासच्या नटेशन् कंपनीनें प्रसिद्ध केलेलें पुस्तक जरा विस्तृत पण निराळ्या तऱ्हेनें लिहिलेलें पाहण्यांत आलें. श्रीमदाचार्यांनीं आसेतुहिमाचल दिग्विजय करून सत्सिद्धान्ताची सर्वत्र स्थापना केली; पण कर्नाटक व मद्रास या इलाख्यांच्या बाहेर त्यांची आजमितीस फारशी ओळखही राहिलेली नाहीं, असें सर्वत्र या मतासंबंधीं दिसून येणाऱ्या उदासीनतेवरून म्हणावें लागतें. त्यांचें माहात्म्य किती

मोठें होतें, त्यांनीं केवढी मोठी कामगिरी करून अखिल वैदिकधर्मीयांवर अविस्मरणीय उपकार करून ठेविले आहेत वगैरे गोष्टींचें ज्ञान लोकांस होणें अवश्य असून त्यांचे चरित्रग्रंथ सर्व प्रचलित सुधारलेल्या भाषांत प्रसिद्ध होणें अवश्य आहे. इंग्रजींत एक व कानडींत एक असे दोन बहुमोल चरित्रग्रंथ मद्रास हायकोर्टाचे सुविख्यात वकील श्री. सी. एम्. पद्मनाभाचार्य बी. ए. बी. एल्. यांनीं थोडे दिवसांपूर्वीं प्रसिद्ध करून लोकांवर मोठे उपकार केले आहेत. असें चरित्र आजपर्यंत प्रसिद्ध झालेलें नव्हतें. त्या चरित्राच्या आधारें व त्यांच्या परवानगीनें प्रस्तुतची अल्पसेवा मीं श्रीविष्णुप्रेरणया व श्रीविष्णुप्रीत्यर्थ केली आहे. या चरित्रापासून लोकांच्या मनावर अल्प जरी इष्ट परिणाम घडून आला तरी माझ्या परिश्रमाचें चीज झालेंसें होईल. श्रीपद्मनाभाचार्यांनीं दिलेल्या परवानगीबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. अस्तु.

हें चरित्र लिहून झाल्यावर कोल्हापूर येथील प्रसिद्ध विद्वान् रा. ब. कृष्णराव नारायण पंडितराव बी. ए. एल्एल्. बी. रिटायर्ड चीफ जज्जसाहेब यांनीं आपला बहुमोल वेळ खर्चून मोठ्या प्रेमानें तपासून दिलें याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. वेदतीर्थ विरूपाक्षशास्त्री वाडियर ( देवास ) यांनीं कानडी भाषेसंबंधाच्या माझ्या अडचणी दूर करण्यांत मला केलेल्या निरपेक्ष मदतीचा आभारपूर्वक उल्लेख करण्यास मला फार संतोष वाटतो. तसेंच रा. कृष्णाजी विष्णु आचार्य कालगांवकर यांनीं त्यांस सांपडलेल्या श्रीमध्वस्तोत्रांतील श्लोक प्रसिद्ध करण्यास दिले व वांई येथील वै. वा. वे. शा. रा. माधवाचार्य कानडे यांनीं श्रीनरसिंहादि देवतांवर केलेल्या प्रासादिक आरत्या वे. शा. रा. रंगाचार्य रड्डी यांनीं दिल्या. वै. वा. विठोबाअण्णा दप्तरदार यांनीं केलेलें श्री-

पूर्णप्रज्ञार्तिक्य व श्रीमध्वप्रतापाष्टक हीं स्तोत्रमहोदधींतून घेतलीं आहेत. याबद्दल चरित्रलेखनकार या सर्वांचा आभारी आहे. श्रीमदाचार्यांच्या चरित्राबरोबरच त्यांच्या मंगलमय मूर्तींच्या दर्शनाचाही लाभ वाचकांस घडावा असा आमचा उद्देश; परंतु त्यांच्या दोन तऱ्हेच्या प्रतिमा असल्यामुळें ह्या चरित्रांत कोणती घालावी हा विचार आम्हांस पडला. कर्नाटकांत एक प्रतिमा प्रसिद्धच आहे; दुसरी मात्र प्रसिद्ध असल्याचें आम्हांस माहीत नाहीं. श्रीउडुपी येथीलच एका कुशल चित्रकारानें काढलेल्या एका जुन्या तसबिरीची प्रतिकृति ( फोटो ) आयुर्वेदमहोपाध्याय . वासुदेवाचार्य ऐनापुरे ( मुंबई ) यांच्या संग्रहीं होती. ती त्यांनीं मेहेरबानी करून मला दिली. ह्या दुसऱ्या प्रकारच्या मूर्तींचेंही दर्शन वाचकांस घडावें म्हणून तीच पुस्तकांत घातली आहे. फोटो दिल्याबद्दल आ. म. ऐनापुरे यांचा मी फार आभारी आहें. शेवटीं एका गोष्टीचा उल्लेख करणें माझें आद्यकर्तव्य आहे. ती ही कीं, श्रीमान् पंडितप्रवर रंगाचार्यशास्त्रीबोवा रड्डी यांनीं मनावर घेतल्यामुळेंच हें चरित्र आज प्रसिद्ध होणें शक्य झालें. अर्थात् यासंबंधाचें सर्व श्रेय त्यांजकडे असून चरित्रांत कांहीं उणीवा अगर दोष राहिले असतील तर तो प्रमाद माझा आहे. वाचक मला त्याबद्दल क्षमा करितील अशी आशा आहे. इहपरसुखदायी श्रीमन्मध्वसिद्धान्तज्ञानाचा सर्वत्र उत्कर्ष होवो अशीं श्रीहरिगुरुचरणारविंदीं साष्टांगनमस्कारपूर्वक प्रार्थना करून मी वाचकांची रजा घेतों.

मु. देवास.<br>
श्रीहयग्रीवजयंती<br>
शके १८३८

वैष्णवसेवक,<br>
**रामचंद्र हयग्रीव मणूरकर.**

## श्रीपूर्णप्रज्ञार्तिक्यम् ।

जय देव जय देव स्वामिन् मध्वगुरो । द्वैताचार्य दयार्णव पदतन-कल्पतरो ॥ जय० ॥ हरिरेवैकः सेव्योऽपरिमितगुणविततिः । त्रिविधानां जीवानां स एक एव गतिः ॥ स्वस्वोचितनिजशर्मप्राप्तिः किल मुक्तिः । साधनमस्याः स्यात् श्रीपतिपदपंकजभक्तिः ॥ भेदाः पंच च नित्याः सत्याखिलजगती । इति विलसति सति भुवने भवतो यस्य मतिः ॥ जय देव० ॥ १ ॥ भगवति भुजंगशायिनि योऽनुचरो वातः । तस्मिन् श्रीरघुनाथे योऽसौ पवनसुतः ॥ कृष्णे वृष्णिकुलेशे यो भीमः पार्थः । यो वेदव्यासेऽस्मिन्हंसः सन् भक्तः ॥ यः श्रीधरचरणांबुजसंसेवननिरतः । तं त्वां सन्तं विनमति कविविठ्ठलपंतः ॥ जय देव ॥ २ ॥ इति

———

# श्रीमदानन्दतीर्थभगवत्पादाचार्याः ।



श्रीशो विश्वं विधाता विमलगुणनिधिः सर्वसेव्यः स्वतन्त्र-॥
स्तद्भक्तिर्मुक्तिहेतुर्विलसति सततं तारतम्यं च विश्वम् ॥
सत्यं भेदश्च नित्य इति समुपदिशन् सज्जनान् मोदयन्तं ॥
ध्यायेच्छ्रीशाङ्घ्रिपूजारतममलमतिं श्रीमदानन्दतीर्थम् ॥ १ ॥

# प्रस्तावना.

दोन तीन वर्षांपूर्वीं पुणें येथें रा. रामचंद्र हयग्रीव मणूरकर राहणार देवास, यांनीं येथील वैष्णव मंडळी जमवून महाराष्ट्र देशांतील वैष्णव मंडळांची धार्मिक, सामाजिक व व्यावहारिक होत असलेली अवनति सर्वांपुढें मांडिली व ही परिस्थिति बदलण्याकरितां श्रीमन्मध्वमतप्रचारिणी सभा ( शाखा पुणें ) ही संस्था अस्तित्वांत आणिली. ही गोष्ट आतां महाराष्ट्रीय वाचकांस अपरिचित नाहीं. या सभेनें व्याख्यानें, आचार्योत्सव व वैष्णव सद्गृहस्थांचे सन्मान अशा रीतीनें आजपर्यंत आपलें काम स्वल्प प्रमाणांत चालविलें आहे. सभेच्या कार्यक्रमांत वैष्णवधर्माविषयीं अथवा महनीय व्यक्तींविषयीं माहिती देणारे ग्रंथ छापून प्रसिद्ध करावेत हा एक भाग आहे. त्याप्रमाणें कांहीं कर्नाटकीय सन्मान्य गृहस्थांकडून लेख आले ते, व सभेंत झालेलीं कांहीं व्याख्यानेंही छापण्यास योग्य अशीं असलेलीं सभेच्या दप्तरीं लिहून तयार आहेत. परंतु हे सर्व लेख मासिकपुस्तकांतून येणें प्रशस्त असल्यामुळें ते स्वतंत्र ग्रंथरूपानें प्रसिद्ध करणें सभेच्या चालकांस युक्त वाटलें नाहीं. अशा तऱ्हेचें मासिक पुस्तक चालविण्याचा भार शिरावर घेण्यास योग्य अशी विद्वान् व आधुनिक विचारांनीं परिपक्व झालेली वैष्णव मंडळी या पुणें शहरीं पुढें न आल्यामुळें तो विचार कांहीं दिवस तहकूब ठेवणें भाग पडलें आहे. परंतु कांहीं मंडळींच्या मनांत होईल तेवढें स्वल्प तरी कार्य करून वैष्णवसमाजसेवा करावी अशी उत्कट इच्छा झाल्यामुळें प्रस्तुतचें श्रीमदाचार्यचरित्र हें तिचें फळ होय.

सध्यां महाराष्ट्रीय वैष्णववर्गाकडे पाहिलें असतां मन अत्यंत निराशापूर्ण होऊन विव्हळ होतें. कर्नाटकांतून निघून या प्रांतीं येऊन राहिलेल्या प्राचीन वैष्णव मंडळींची विद्वत्ता, कर्तृत्वशक्ति, सन्मान इत्यादि गोष्टी कोणीकडे व आज प्रत्येक बाबतींत मागसलेली अशी ही परिस्थिति कोणीकडे ? स्वमताचें ज्ञान, सदाचाराचें शिक्षण, धर्माभिमान, कर्तव्यनिष्ठापूर्ण पुरुषार्थाभिमान वगैरे कोणत्याही गोष्टी या वर्गांत दिसून येत नसल्यामुळें हा वर्ग सर्व उच्च स्थितीस, विचारास व धर्मास पारखा झाला आहे. यांतील बरेच लोक शैवप्राय बनून अज्ञानानें स्वमताविषयीं उदासीन--एवढेंच नव्हे तर परमतानुयायी--होऊन स्वमतंनिंदकही बनले आहेत. अशीच स्थिति राहिल्यास येथें श्रीमदाचार्यांच्या धर्मवृक्षाचें रुजलेलें बीं नामशेष होऊन सद्वैष्णवांस त्याबद्दल वाईट वाटल्यावांचून रहाणार नाहीं. या परिस्थितीस वेळींच उपाय योजून ती सुधारणें हें कर्नाटकीय सद्वैष्णव गृहस्थांचें व श्रीमदाचार्यपीठावरील यति गुरुवर्यांचें अवश्य कर्तव्य आहे. कोणत्याही धर्मातील मनुष्य स्वधर्म सोडून परधर्माभिमुख होत असेल तर त्याच्या स्वधर्मीयांस अत्यंत वाईट वाटलें पाहिजे. मग हा परधर्म ख्रिस्ती असो, आर्यसमाजी असो अथवा अन्यदीक्षारूप असो; तेव्हां असा हा वैष्णव समाजाचा होत असलेला ऱ्हास दूर करण्यास ही संस्था स्थापन झाली असून क्रमाक्रमानें यावच्छक्य समाजजागृति करण्याचा तिचा विचार आहे. यास सर्व सद्वैष्णव व श्रीमदाचार्य यांच्या कृपादृष्टीचें साहाय्य मिळून तो पूर्ण यशस्वी होईल अशी या संस्थेंतील सर्व सभासदांची दृढ आशा आहे.

या भरतखंडांत सद्धर्माचे पूर्ण अभिमानी अशा ज्या महनीय व्यक्तींनीं भक्तिमार्गाचा प्रसार करून सदाचरणाचीं बीजें समाजांत रुजविलीं त्यांतील श्रीमदाचार्य ही विशेष तेजस्वी मूर्ति होय. भागवत मत जरी वल्लभादि आचार्यांनीं प्रसृत करण्याचा यत्न केला आहे व श्रीकृष्णभक्तीचा परिपोषही त्यांनीं उत्तम केला आहे, तथापि भक्त्यतिरेकामुळें प्रचारांत आलेल्या त्यांच्या पंथांतील कांहीं गोष्टी सुशील विद्वानांस अप्रशस्य वाटत आहेत. श्रीमदाचार्यांच्या मतें रामकृष्णभक्तीस प्राधान्य आहे. परंतु ही भक्ति साधण्यास त्यांनीं समाजोपयोगी सदाचरणाच्या नियमांकडे लवमात्रही दुर्लक्ष केलेलें दिसत नाहीं. ही गोष्ट आचार्यानुयायी सत्पुरुषांचें आचरण अनसूया बुद्धीनें जो निरीक्षण करील त्याच्या प्रत्ययास आल्यावांचून रहाणार नाहीं. आचार्योपदेश म्हणजे तारतम्यभावानें ईश्वराराधना, ईश्वरभक्ति, सद्ग्रंथपठन व श्रौतमार्गातील सत्कर्मांचें अनुष्ठान ह्याच गोष्टी होत. भक्तिमार्गाच्या विस्ताराचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां आपणांस असें आढळून येईल कीं, आचार्यांच्या अवतारानंतर तो विशेष भरभराटीस आलेला आहे. आचार्य हे जरी भक्तिमार्गाचे पुरस्कर्ते आहेत तरी ते ज्ञानमार्ग व कर्ममार्ग यांचे विरोधी नाहींत हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. अर्वाचीन भक्तिमार्गानुयायी यांच्यांत जें थोडेसें वैगुण्य दिसून येतें तें हें कीं, ते भक्तीच्या प्रभाववर्णनांत कर्ममार्गाचा बराच उपहास करितात व कधीं कधीं ज्ञानमार्गासही गौणत्व आणण्याच्या नादीं लागलेले दिसतात. ज्या वैदिक कर्ममार्गाचा आज हजारों वर्षें आपल्या या देशांत संप्रदाय सुरू आहे, ज्या विशेष कर्मानुष्ठानानें आपण विशिष्ट संघरूप बनून इतर

समाजावर आपलें वर्चस्व स्थापून कर्तृत्व जगास दाखविलें, ज्या आपल्या विचारशक्तीनें आत्मानात्मविचार करून सर्वांस आश्चर्यकारक अशीं शास्त्रें निर्माण केलीं, त्या सर्व गोष्टी अथवा त्या सर्व विभूति यांचें गौरव न करितां भक्तिमार्गाच्या नांवावर त्यांचा उपहास होत असेल तर विचारी मनुष्यास त्यापासून खेद झाल्यावांचून रहाणार नाहीं. शिवाय युक्तीवांचून भक्तीचें प्रस्थ माजविणें हें श्रद्धाजडावांचून इतरांच्या हातून होणें नाहीं. श्रीमदाचार्यांच्या कर्तृत्वाची आम्हांस विशेष जी प्रशंसा करावीशी वाटते त्याचें कारण हेंच कीं, त्यांनीं भक्तिमार्गाचा जो विस्तार केला तो युक्तिवादांनीं परमतखंडन करून केलेला आहे. आचार्य यांची न्यायशास्त्रांत अथवा सदनुमानांत अद्वितीय बुद्धि होती हें त्यांच्या जागजागीं वर्णन केलेल्या प्रतिपक्षखंडनाच्या गोष्टींवरून व 'अनुमानतीर्थ' या पदवीवरून सिद्ध होत आहे. तेव्हां युक्तिवादांनीं भक्तिमार्गाचें पुनरुज्जीवन करणारे या दृष्टीनें आचार्य हे विशेष प्रशंसनीय होत. आचार्यांची आयुर्मर्यादा बरीच विस्तृत असल्यामुळें त्यांनीं आपलें कर्तृत्वही उत्तम रीतीनें करून दाखविलें. त्यांनीं आपल्या आयुष्यांत विविध पंडितांशीं वाद करून विष्णुसर्वोत्तमत्व, विश्वसत्यत्व, पंचभेद इत्यादि मतें निश्चित ठरवून ईश्वराराधना, तीर्थपर्यटन व सच्छास्त्रव्याख्यान या गोष्टी अवतारसमाप्तीपर्यंत सतत चालविल्या होत्या. तेव्हां अशा विभूतींचें चरित्र महाराष्ट्रभाषेंत होणें हें किती उपयुक्त आहे हें निराळें सांगणें नको.

आपण साधारणतः कोणत्याही वाङ्मयांतील ग्रंथसंग्रहाकडे पाहिलें असतां आपणांस असें आढळून येईल कीं, शास्त्रीय ग्रंथांच्या

तोंडीचे अथवा कांकणभर जास्तच, असे समाजहितकर्ते इतिहासग्रंथ अथवा चरित्रग्रंथ हे होत. आज जगांतून पाणिनी, गौतम, कपिल, पतंजलि इत्यादिकांचीं शास्त्रें नामशेष झालीं तर त्यापासून समाजाचें जें नुकसान होईल त्यापेक्षां रामायणभारतादि ऐतिह्यप्रधान प्रबंध नष्ट झाले तर किती तरी पटीनें जगाचें अकल्याण होणार आहे ! यावरून आम्ही जें चरित्राचें महत्त्व विशेष आहे असें म्हणतों त्याची उपयुक्तता कळून येईल. मनोरंजन करणाऱ्या काल्पनिक कादंबरीनाटकादि प्रबंधापासून जरी कांहीं वेळ मनोवृत्ति संतुष्ट होते तथापि मागाहून ही सर्व कल्पिलेली गोष्ट आहे, तेव्हां यापासून सर्व गोष्टी आपणांस व्यवहारांत घडवून आणण्यास शक्यता आहे कीं नाहीं याचा निश्चय होत नाहीं इत्यादि विचारांनीं कर्तृत्ववान् मनुष्याचा निरुत्साह होतो. परंतु चरित्रांतील व इतिहासांतील गोष्टी व्यवहारांत घडल्या असल्यामुळें त्यांजविषयीं आपण उद्योग केला असतां या साध्य आहेत अशी भावना होऊन त्या आचरण्याविषयीं अधिकारी पुरुषाची प्रवृत्ति होते. तेव्हां कादंबरी, काव्यें, नाटकें यांपेक्षां चरित्रग्रंथांचें महत्त्व काय आहे हें यावरून समजून येईल. चरित्रग्रंथांतही चरित्रनायकाचा समानकालीन अथवा अल्प कालानंतर झालेला असा तो लेखक असेल तर त्या चरित्राचें महत्त्व विशेष समजलें पाहिजे. कारण, अशा लेखकाच्या चरित्रांत अंधश्रद्धेनें, अज्ञानानें अथवा मात्सर्यानें चरित्रनायकासंबंधानें प्रचलित असलेले सदसत्प्रलाप यांस जागा मिळत नाहीं. प्रस्तुत चरित्रकार नारायणपंडिताचार्य यांच्या व आचार्यांच्या कालांत फार स्वल्प अंतर असल्यामुळें—फार काय पण प्रस्तुत चरित्रकारांस आचार्यांचें प्रत्यक्ष

दर्शन होण्याचाही संभव असल्यामुळें—वर लिहिलेल्या दोषांपासून हें चरित्र अलिप्त आहे व म्हणूनच विशेष विश्वसनीय आहे अशी सुज्ञ वाचकांची खात्री होईल.

श्रीमदाचार्यांच्या चरित्राचें सामान्यतः अवलोकन केलें असतां आपणांस असें दिसून येईल कीं, आचार्य हे बालपणापासूनच भगवद्भक्त, विषयसुखपराङ्मुख, मातृपितृभक्त, सदाचरणी, शास्त्र-व्यासंगी, वादकुशल, तीर्थसंचारप्रिय व महामेधावी असे होते. समाजावर छाप बसविण्यास यांतील एकेक गुणही पुरेसा आहे. मग वरील सर्व गुणांचा समवाय हा लोकादरास व लोकश्रद्धेस कसा पात्र होणार नाहीं ? यांतच आचार्यांची अत्यंत विरक्तवृत्ति व भग-वद्भक्ति या दोन गुणांची विशेष तेजस्विता दिसून येते. नौकेंतील सर्व द्रव्य व्यापाऱ्यांनीं आचार्यचरणीं अर्पण केलें असतां वैराग्याति-शयानें त्याचा स्वीकार न करून केवळ श्रीकृष्णप्रीतीनें द्वादशपुंड्र-मुद्राधारणार्थ जी गोपीचंदनाची याचना आचार्यांनीं केली त्यावरून आम्हीं वर दर्शविलेले गुणमाहात्म्य वाचकांस समजून येईल. धर्मसंस्था-पकाच्या अंगीं तत्त्वज्ञान, विद्वत्ता, सभापांडित्य हे गुण जितके अवश्य आहेत तितकेच सुशीलता, निस्पृहता व सदाचरण हेही अवश्य आहेत. या दोन्ही प्रकारच्या गुणांचा श्रीमदाचार्यांच्या ठिकाणीं जितका विकास व परिपोष झालेला दिसतो तितका अन्यत्र क्वचितच दृष्टीस पडेल. जें कांहीं सर्व आयुष्यांत त्यांनीं उपदेशिलें आहे तें श्रीहरिसेवा, नवविधा भक्ति, दशविध भजन, अंकन, नामकरण हें होय. व जें कांहीं करून दाखविलें तें हें कीं, शिष्यसमूहास सदाचरणी व व श्रीहरिभजनीं लीन करून सोडिलें. तेव्हां अशा सच्छील

शिरोमणींचें चरित्र सतत पठन केलें असतां कोणाचें चित्त पवित्र होणार नाहीं ? श्रीहरिसेवालालसा कोणाच्या मनांत उत्पन्न होणार नाहीं ? व सत्कर्म कोणाच्या हातून घडणार नाहीं ?

वायुदेवाचे श्रीहनुमान्, भीम, मध्व हे तीन अवतार होत अशी सर्व आस्तिक सद्वैष्णवांची श्रुतिस्मृति व श्रीमदाचार्योक्ति यांवरून श्रद्धायुक्त भावना आहे. अर्थात् या भावनेचा गुणसादृश्यानें परिपोष करणाऱ्या ज्या गोष्टी आचार्यचरित्रांत दिसून येतील त्यांचें भक्तियुक्त अंतःकरणानें वर्णन करणें हें त्यांस युक्तच होय. हें वर्णन इतर लोकांस जरी अतिशयोक्तिपूर्ण वाटलें तरी त्यास नाइलाज आहे. तेव्हां अशा दृष्टीनें पाहिलें असतां आचार्यांचें कुलित्थभक्षण कदलीभक्षण, पयःपान इत्यादि आहारसामर्थ्यद्योतक अतिशयोक्तिरूप भासणाऱ्या गोष्टी अयुक्त वाटणार नाहींत. या गोष्टींवरून भीमसेन व आचार्य यांचें ऐक्यच सिद्ध होतें. तसेंच जागजागीं वर्णन केलेल्या आचार्यांच्या अद्वितीय शरीरसामर्थ्याचें हेंच रहस्य होय. या वर्णनांवरून हनुमान्, भीम व श्रीमदाचार्य हे समान गुणधर्म असल्यामुळें एकाच देवतेचे अवतार होत असें निःशंक सिद्ध होतें. आचार्यांचा द्वादशस्तोत्र हा ग्रंथ अवलोकन केला असतां त्यावरून आचार्य गायनकलानिपुण होते असें स्पष्टपणें दिसून येतें. श्रीहनुमान् हे गायनकलाप्रवर्तकांत अग्रेसर होते हें संगीतरत्नाकरादि ग्रंथांवरून उघड होत आहे. या चरित्रांतही आचार्यांच्या गायन कलेचा उल्लेख आला आहे. तेव्हां या सर्व गोष्टींवरून श्रीमदाचार्य, हनुमान् व भीम एकाच देवतेचे अवतार होत हें

या गुणैक्यानें स्पष्ट दिसून येत असल्यामुळें चरित्रांतील या गोष्टी कोणी अप्रस्तुत समजणार नाहीं.

श्रीमन्मध्वमताची संक्षेपानें दिशा दाखवावयाची म्हणजे पुढें लिहिल्याप्रमाणें दाखवितां येईल. या संप्रदायांत कर्म, उपासना व ज्ञान हीं तीन मोक्षप्राप्तीस साधनें मानिलीं आहेत. त्यांत ज्ञान हें प्रत्यक्ष साधन आहे व कर्म आणि उपासना हीं परंपरेनें साधनें आहेत; म्हणजे कर्म, व उपासना यानीं श्रीहर्यनुग्रहपूर्वक ज्ञान होऊन नंतर मोक्षप्राप्ति होते. या संप्रदायांत श्रौतस्मार्तादि सर्व कर्मांचा आदर असून त्यांत अंकन, नामकरण व भजन हे प्रकार विशेष आहेत. अंकन म्हणजे केशवादिद्वादशभगवन्नामसंज्ञक गोपीचंदनाचें द्वादश नाम ललाटकंठभुजोदरादि अवयवांवर लावणें व त्यांवर शंखचक्रादि भगवदायुधें मुद्रित करणें हें होय. श्रीहरिस्मरण व भगवद्भक्ति व्यक्त करण्याकरितां हा विधि आहे. यास श्रुतिस्मृतिप्रमाणें विपुल आहेत. नामकरण म्हणजे आपल्या पुत्रादिकांस संज्ञार्थ भगवन्नामें देणें होय. याचाही हेतु वरीलप्रमाणेंच आहे. भजनाचे दहा प्रकार आहेत. या दहा प्रकारच्या क्रिया ईश्वरार्पणपूर्वक करणें यांसच भजन म्हणतात. हें भजन वाणीनें चार प्रकारचे होतें; तें असें प्रिय बोलणें, सत्य बोलणें, हितकर बोलणें व स्वाध्याय पठन करणें. शरीरानें तीन प्रकारचें होतें; तें असें, दान करणें, रक्षण करणें व संकटांतून मुक्त करणें. मनानें, दया करणें, सदिच्छा धरणें, व विश्वास ठेवणें असें तीन प्रकारचें होतें. याप्रमाणें भजन हें दशविध मानलें आहे. श्रीमदाचार्यांच्या संप्रदायांत अनंत कल्याणगुणगणपूर्ण श्रीमन्नारायणाची आराधना ही प्रधान आहे. इतर

रमाब्रह्मादि देवता तारतम्यानें पूजिल्या जातात. म्हणजे विष्णु हा सर्वोत्तम असून रमाब्रह्मादिदेवता तत्सेवकपरिवारभूत आहेत, असा सिद्धांत आहे. या अवांतर देवतांची पूजा तारतम्यानें विहित आहे.

कर्म, उपासना हीं दोन्हीं ज्ञानाचीं साधनें आहेत व तद्द्वारा मोक्ष मिळतो हें वर सांगितलेंच आहे. मायावादांत ज्ञानोत्तर कर्म निष्फल आहे असें जें सांगितलें आहे, तसें या संप्रदायांत नाहीं. ज्ञानोत्तर कर्म हें श्रीहरिप्रीतीस व मोक्षोत्कर्षास उपयुक्त आहे असा श्रीमदाचार्यांचा श्रुतिस्मृत्यनुकूल सिद्धांत आहे. या संप्रदायांतील ज्ञानमार्ग पंचभेदाधिरूढ झाला आहे. १ जीवेश्वरभेद, २ जीवजडभेद, ३ जीवजीवभेद, ४ जडजडभेद आणि ५ जडेश्वरभेद, असे हे पांच भेद अनादिनित्य आहेत. श्रीमदाचार्यांनी प्रस्थानत्रयी ( ब्रह्मसूत्रें, गीता व उपनिषदें ) वर भाष्य करून सर्व प्रमाणांनीं सयुक्तिक विचारपूर्वक निष्पन्न होणारे सिद्धान्त सज्जीवोद्धारणार्थ प्रस्थापित केले आहेत. ब्रह्मसूत्रांतील प्रथम सूत्र जें " ॐ अथातो ब्रह्मजिज्ञासा ॐ " यांतील ब्रह्मपदाचा अर्थ गुणपरिपूर्ण भगवान् विष्णु असा केला आहे व त्याच्या उपपत्त्यर्थ श्रुतिस्मृतींतील प्रमाणें दिलीं आहेत.

विहितसत्कमाचरणानें व शमदमादिसाधनसंपत्तीनें भगवदपरोक्षज्ञान ( विष्णुसर्वोत्तमज्ञान ) होऊन भगवत्प्रसादानें त्या ज्ञानद्वारा मोक्ष होतो; निरवधिक आनंदानुभव हे मोक्षस्वरूप होय; मोक्षस्थितींतील आनंदास वृद्धि क्षय नसतात; या निरवधिक व सततप्रवाही आनंदानुभवानें जीव जरी श्रीहरिसदृश भासला तरी स्वतंत्रत्वजगत्कर्तृत्वादिशक्ति त्यास नसतात, असा श्रीमदा-

चार्यांचा सिद्धान्त आहे. तात्पर्य, मुक्तावस्थेंत देखील जीवेश्वरांचें ऐक्य नाहीं हें निश्चित आहे. सामीप्य, सालोक्य, सारूप्य व सायुज्य असे चार मुक्तीचे प्रकार श्रीमदाचार्यांनीं गृहीत आहेत. त्यांतील पहिल्या तीन प्रकारांचें विवेचन करण्याचें कारण नाहीं. सायुज्य-मुक्तीविषयीं थोडीशी माहिती देणें इष्ट आहे. सायुज्य याचा अर्थ जीव परमात्म्याचें ठिकाणीं संयुक्त होतो असा आहे, म्हणजे ऐक्य होतें असें समजूं नये. ही मोक्षस्थिति अशी आहे कीं, " आदत्ते हरिहस्तेन हरिदृष्ट्यैव पश्यति । गच्छेच्चहरिपादाभ्यां मुक्तस्यैषास्थितिर्भवेत् । " तात्पर्य, दुधांतील पाण्याचे व्यवहार हे दुधाच्या व्यवहारावर अथवा भिजलेल्या वस्त्रांतील जलाचे व्यवहार हे जसे त्यावस्त्रावर अवलंबून असतात, तशीं सायुज्यमुक्तीस पोहोंचलेल्या जीवाची स्थिति होय. जलमिश्रित दुग्धांतील जलाचें ज्ञान सामान्य जनांस जसें पृथक्त्वानें होत नाहीं परंतु त्या जलांत व दुग्धांत जसा वस्तुतः भेद आहेच तसाच हा जीवेश्वरांचा भेद सिद्ध आहे.

आतां, "तत्त्वमसि" इत्यादि जीं श्रुतिवाक्यें आहेत त्यांचा रहस्यार्थ अद्वैतमतास अनुकूल नसून द्वैतमतानुकूल आहे असें श्रीमदाचार्यांनीं प्रमाण व युक्ति यांनीं सिद्ध केलें आहे, त्याचा थोडासा विचार करूं. " तत्त्वमसि " या वाक्यांत अद्वैती इतर सर्व शास्त्रांत अप्रसिद्ध असलेल्या जहदजहल्लक्षणेचा स्वीकार करितात. श्रीमदाचार्य सर्व शास्त्रप्रसिद्ध गौणिलक्षणेचा स्वीकार करून ' तत्सदृश तूं आहेस ' असा त्या वाक्याचा अर्थ प्रतिपादितात. " ब्रह्मवेद ब्रह्मैव भवति " या आपाततः ऐक्यार्थ प्रपिपादक वाक्याचा अर्थ अर्थवादरूप घेऊन, " संपूज्य ब्राह्मणं भक्त्या

शूद्रोऽपि ब्राह्मणो भवेत् " या वचनांतील व्यवस्थेप्रमाणें लावितात. " अहं ब्रह्मास्मि " इत्यादि वाक्यांची अशीच उपपत्ति करितात. "विज्ञानमानंदं ब्रह्म" हें वाक्य आनंदगुणविशिष्ट ब्रह्माचें प्रतिपादक आहे असें मानतात व तसें मानणें युक्तही आहे. कारण, आनंद हें विशेषण मानलें नाहीं तर तो शब्द पुंलिंगी आहे. या वाक्यांतील नपुंसकलिंगी शब्दाची उपपत्ति मत्वर्थी अच् प्रत्यय करून विशेषण केल्याशिवाय होणार नाहीं. अर्थात् हें वाक्य ऐक्यार्थ प्रतिपादक होत नाहीं. " सदेवसोम्येदमग्र आसीत् " इत्यादि श्रुतीही " त्वदधीनं यतः सर्वं अतः सर्वो भवानिति " किंवा " यदधीना यस्य सत्ता तत्तदेवेति भण्यते " या दृष्टीनें नियामकत्वानें लाक्षणिक सर्वैक्य वर्णित आहे, वस्तुतः ऐक्य नाहीं असें प्रतिपादतात. " नेह नानास्ति किंचन " इत्यादि श्रुति रामकृष्णादि अवतारांचें ऐक्य प्रतिपादक आहेत. इत्यादि इत्यादि पुष्कळ श्रुतिवचनांचा विचार युक्तियुक्त केला आहे; व तसेंच स्वसिद्धांतास " द्वासुपर्णा सयुजा सखाया " " सत्यं भिदा, सत्यं भिदा, सत्यं भिदा " इत्यादि श्रुति व ' द्वाविमौ पुरुषौ लोके ' इत्यादि स्मृतिवचनें प्रमाण दिलीं आहेत, मायावादाचें निर्मूलत्व अनुमानांनीं उत्तम तऱ्हेनें सिद्ध केलें आहे, या सर्व गोष्टींचा विचार विशेष विस्तृत रीतीनें प्रमाणपूर्वक " श्रीमन्मध्व सिद्धांतसंग्रह" या नांवाचें दुसरें पुस्तक प्रसिद्ध करण्याचा या सभेचा विचार आहे त्या वेळेस करावा असा मानस आहे. म्हणून हा लांबलेला विषय येथेंच पुरा करितों. तसेंच वैष्णवसांप्रदायी विद्वानांनीं स्वीकृत पिष्टपशुविधिसंबंधानेंही पुष्कळ वचनें व माहिती वाचकांपुढें ठेवून हा संप्रदाय प्रस्तुतकालीं किती अविधियुक्त आहे हें व

सांप्रत यज्ञांत होत असलेले पशुघात किती अविचारमूलक आहेत हा विचार करण्याचा हेतु होता परंतु विस्तार बराच झाल्यामुळें दुसऱ्या एकाद्या वेळीं तो करण्याचें ठरवून सध्यां येथेंच तोही विचार सोडावा लागत आहे.

या पुस्तकांतील दहावा भाग श्रीमदाचार्यांचा कालनिर्णय हा कालतत्त्व-चिकित्सकांस मोठा विचारार्ह आहे. या चिकित्सेंत ग्रंथकर्त्यांनीं केलेला विचार विचारार्ह आहे. पौराणिक किंवा कांहीं ग्रंथारंभीं असलेल्या वचनांपेक्षां शिलालेख व मठस्थ आचार्यांच्या कारकीर्दी व व्यवहार यांस जें प्राधान्य दिलें आहे तें चिकित्सा दृष्टीला योग्य आहे. तथापि या मुद्यासंबंधानें अनुकूल प्रतिकूल वचनें कोणाही सद्गृहस्थांस सांपडल्यास तीं आम्हाकडे पाठवावीं अशी आमची विनंति आहे.

सदरहु पुस्तकाच्या शेवटीं चरित्रकारांनीं श्रीमध्वमुनिप्रतापाष्टक, पूर्णप्रज्ञार्तिक्य व प्राचीन मराठी कवीचे श्रीमध्वरायांवरील सांपडलेले श्लोक दिले आहेत, ते वाचून सद्वैष्णवांस आनंद होईल अशी पूर्ण भावना आहे. तसेंच श्रीलक्ष्मीनरसिंहादिकांच्या आरत्या दिल्या आहेत, त्याही भक्तिरसपूर्ण व शुद्ध असल्यामुळें सद्वैष्णव वाचकांस नित्य पठन करण्यास योग्य आहेत. शेवटीं श्रीमन्मध्व-मताभिमानी रा. मणूरकर यांनीं ही जी श्रीमदाचार्यांची मनोरम सेवा केली आहे तिनें श्रीमदानंदतीर्थगुर्वंतर्यामी श्रीवेदव्यास त्यांचे कल्याण करोत व त्यांच्या उत्साहानुरूप उत्तरोत्तर वैष्णवभक्तिपरिपोषक ग्रंथ त्यांचे हातून निर्माण होवोत, अशी मनापासून श्रीहरीची प्रार्थना करून ही लांबलेली प्रस्तावना पुरी करितों.

श्रीमदानंदतीर्थानुचरः

**श्रीरंगशर्मा.**

॥ श्रीलक्ष्मीहयग्रीवायनमः ॥

# श्रीमन्मध्वचरितामृत.

## भाग १ ला.

### पूर्ववृत्त आणि जन्म.

॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

वाणीं ब्राह्मीं विशोभामवगणितकचां ह्रीनिमग्नां वधूं स्वां ।
वाचाहीनं वितन्वन् कलिकृतकलुषैः कर्शितांगीं शुभांगीम् ॥
अंबाहीनप्रजानामिव कलरुदितादार्द्रचित्तोऽवतीर्ण- ।
स्सम्मानार्थं जनेभ्यः सदयमदितमां भारतीशः पुनातु ॥

" विक्षिप्तसंग्रहात्क्वापि क्वाप्युक्तस्योपपादनात् ।
अनुक्तकथनात्क्वापि सफलोऽयं श्रमो मम ॥ "

( न्यायामृत. )

" पवित्रं पाजकक्षेत्रं को न सेवेत कोविदः "

असें श्रीमद्वादिराजयतीन्द्रांनीं तीर्थप्रबंधांत सांगितल्याप्रमाणें श्रीमन्मध्वाचार्यांची जन्मभूमि पाजकग्राम हें परमपवित्र क्षेत्र आहे. भरतखंडाच्या

दक्षिणेस, चन्नपट्टण राजधानीच्या पश्चिमदिशेस असलेल्या दक्षिण कानडा प्रांतांत, उडुपी नांवाचा एक प्रसिद्ध तालुका आहे. उडुपी शहरापासून सहा मैलांवर आग्नेयीस बेल्लिय नांवाचें गांव असून त्याच्या आसपास पाजक वगैरे क्षेत्रें व तीर्थें आहेत. ऊर्ध्वपुंड्र व गंधाक्षत लावणाऱ्या सर्व वैष्णव मंडळांतील, श्रीमदाचार्यांचें स्मारकरूप असलेल्या परम आल्हादजनक ह्या जन्मभूमीचें दर्शन घेऊन रोमांचित गात्र होणारे सज्जन खरोखर धन्य होत !

श्रीमन्नारायणाचे साक्षात् अवतार श्रीपरशुराम, यांनीं आपल्या परशुविक्षेपानें पश्चिमसमुद्रांतरित भूमि हस्तगत करून, कन्नड देशापासून अनंतशयनापर्यंत परशुराम क्षेत्र म्हणून विख्यात झालेलें, पूर्व पश्चिम तीनशें मैल लांब व दक्षिणोत्तर पन्नास मैल रुंद, असें एक क्षेत्र निर्माण केलें. अशी ऐतिहासिक कथा आहे. हा देश परशुराम क्षेत्र म्हणून आजही प्रसिद्ध आहे. उडुपी येथें श्रीमदाचार्यांनीं स्थापन केलेल्या श्रीकृष्णप्रतिमेचें दर्शन करून त्वरेनें यात्रेकरू पाजकक्षेत्रास जातात. प्रातःस्नानानंतर निघालें असतां दक्षिणेस तीन मैलांवर असलेल्या उदयावर नांवाच्या गांवास ते जाऊन पोहोंचतात. ह्या गांवानजीकच दंडतीर्थ नांवाचें एक तीर्थ आहे. आपल्या उपाध्यायास अशोष्य जलप्रदान करण्यासाठीं आचार्यांनीं स्वदंडानें हें तीर्थ निर्माण केलें, म्हणून यास दंडतीर्थ हें नांव पडलें, असें सांगतात. येथून पुढें कांहीं अंतरावर गेलें असतां विमानगिरि दिसूं लागतो. ह्या पर्वताच्या शिखरावर परशुरामानें स्थापिलेलें दुर्गादेवीचें देवालय आहे. नित्य व नैमित्तिक पूजाअर्चा, रथोत्सवादि वैभवद्योतक प्रकार तेथें अजूनही होत असतात. ह्या पर्वताच्या दुसऱ्या बाजूनें

खालीं उतरून यात्रेकरू जवळच असलेल्या पाजक क्षेत्रास जाऊन पोहोंचतात. श्रीपरशुरामनिर्मित धनुस्तीर्थ, शरतीर्थ, अंबुतीर्थ, परशुतीर्थ आणि गदातीर्थ हीं पांच तीर्थें या क्षेत्रांत आहेत. ह्या तीर्थांचें दर्शन घेऊन पाजकग्रामांत गेल्यावर श्रीमदाचार्यांनीं निर्माण केलेलें वासुदेव तीर्थ दृष्टीस पडतें. श्रीमदाचार्यांच्या मातुश्रींचा नित्य पंचतीर्थांच्या सेवेस जाण्याचा नियम असे; परंतु वार्धक्यामुळें त्यांना तितकें दूर जाणें होईना; तेव्हां पंचतीर्थसान्निध्यात्मक हे वासुदेव तीर्थ श्रीमदाचार्यांनीं निर्माण केलें. तेथें जवळच एका पाषाणावर त्यांच्या पादुका उमटलेल्या दिसतात. त्यांची दररोज धूप, दीप, नैवेद्यादि उपचारांनीं पूजा-अर्चा होत असते. तेथून जवळच श्रीकाणूरमठ आहे. या मठाच्या जवळच एक नारळींच्या फडांनीं आच्छादिलेली कुटि आहे, तीच श्रीमदाचार्यांचें जन्मस्थल होय असें सांगतात. श्रीमदाचार्यांचा अवतार झाल्यावेळीं मध्यगेहभट्टांचें हेंच घर होतें. कालवशात् तें नष्ट न होतां काणूरमठाकडून सज्जनसेवेसाठीं त्याचें रक्षण केलें जात आहे. आतां पाहिलें असतां पाजकक्षेत्र हें अगदीं निर्जन व मुनिजनसेव्य असें झालेलें दिसतें. आसपास एका काणूर मठावांचून दुसरी वस्तीच नाहीं. आधुनिक राजांच्या साम्राज्यांत राजकीय अधिकाऱ्यांच्या निवासामुळें भरभराटलेल्या शहरांतच खेड्यापाड्यांतले लोक जाऊन राहूं लागल्याकारणानें शहरांची वाढ होत चालली असून खेड्यापाड्यांना क्षयाची बाधा झालेली दिसून येते. मध्यगेहभट्टांच्या वेळीं पाजकक्षेत्र हें दाट वस्तीचें गांव होतें. ते पाजकग्रामीं येऊन राहाण्यापूर्वीं शिवल्ली नांवाच्या गांवांत राहात असत. पाजकग्रामास आल्यावर त्यांना घरदार, गुरेंढोरें, वृत्तिस्वास्थ्य वगैरे प्राप्त होऊन ते सुखानें आयुष्यक्रमण करीत

होते. गांवाच्या मध्यभागीं त्यांचें घर असल्यामुळें मध्यगेहभट्ट असें नांव त्यांना मिळालें होतें. यांच्या घराच्या जवळ आणखी ब्राह्मणांचीं पुष्कळ घरें होतीं. मध्यगेहभट्ट भारतादि इतिहास व भागवतादि पुराणें सांगत त्यावेळीं पुष्कळ लोक तीं श्रवण करण्यास तेथें येत असत. वेद-वेदांगें व षट्शास्त्रें यांचे अध्यापक अनेक चतुर पुरुष येथील पाठ-शाळांचे अधिपति होते. श्रीमदाचार्य त्यांच्या येथें अध्ययन करीत होते तेव्हां आणखी पुष्कळ मुलें त्यांचे सहाध्यायी होतीं. ह्या सर्व गोष्टींवरून पाजकग्राम हें निवळ खेडें नसून विविध विद्यांचें विलास-स्थान होतें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. मध्यगेहभट्टांचें खरें नांव कोणतें होतें हें प्रसिद्ध नाहीं. भारतभागवतादि इतिहासपुराणांत ते मोठे प्रवीण होते ह्मणून लोकांनीं " भट्ट " ही विद्वत्ता व बहुमान-दर्शक पदवी त्यांस दिली होती. ते सर्व लोकांना फार पूज्य होते. गुरु-स्थानीय पुरुषाचें नामोच्चारण छात्रवर्गानें करूं नये, अशी मर्यादा असल्याकारणानें पाजकग्रामांतील लोक त्यांचें नांव न घेतां " मध्य-गेहभट्ट " याच नांवानें त्यांना संबोधीत असत. अर्थात् या नांवानेंच ते प्रसिद्ध होते. वडिलांसारखीच श्रीमदाचार्यांचे ठिकाणीं लोकांची गुरुत्वबुद्धि, होती हें श्री विद्यारण्यांनीं आपल्या सर्वदर्शनसंग्रह नांवाच्या ग्रंथांत " यथोक्तं मध्यमंदिरेण महाभारततात्पर्यनिर्णये " असें म्हटल्या-वरून स्पष्ट होतें.

यथाकालीं मध्यगेहाचार्यांचें लग्न झालें. पुढें विहितगार्हस्थ्यधर्मानें वसिष्ठ व अरुंधतीप्रमाणें तो पतिपत्नींचा जोडा कालक्रमण करीत असतां त्यांना दोन पुत्र झाले, परंतु ते अल्पवयांतच निवर्तले. त्यानंतर कांहीं दिवसांनीं त्यांना एक मुलगी झाली. दोन मुलें वारल्यामुळें

विषण्णचित्त होऊन आपल्या इष्ट व कुलदेवतेची—उडुपीच्या श्रीअनंतेश्वराची—सेवा करण्यास मध्यगेहभट्ट व त्यांची सुशील पत्नी यांनीं प्रारंभ केला. कर्दमपराशरपांडुप्रभृतींना ज्याप्रमाणें श्रीमन्नारायणाच्या आराधनेनें उत्कृष्ट पुत्ररत्नांची प्राप्ति होऊन त्यांचा उद्धार झाला, त्याप्रमाणें आपल्यालाही दिव्य पुत्र व्हावा ह्मणून त्यांनीं आपल्या पत्नीसमवेत निरंतर निष्कपटभक्तीनें बारा वर्षेंपर्यंत श्रीअनंतेश्वराची सेवा केली. कठिण व्रताचरणानें श्रीहरीस संतुष्ट करून सत्पुत्रसंपत्ति प्राप्त व्हावी ह्मणून त्यांनीं अनन्यभावानें प्रार्थना केली. पुत्रसंतान नसलें तर पुन्नामनरकास जाणें चुकत नाहीं एवढ्याचसाठीं श्रीहरीचीं प्रार्थना केली असें नव्हे तर, सर्व सज्जनांचा उद्धार करणारा सर्वश्रेष्ठ पुत्र आपणांस व्हावा, हा त्यांच्या विशेष सेवेचा आशय होता. मध्यगेहभट्टाचार्यांचे वेळेस शंकराचार्यांचें मत प्रचलित होऊन सुमारें चारशें वर्षें झालीं होतीं; भरतखंडाच्या सर्व भागांत या मताचा फैलाव झालेला होता. सत्यज्ञान मलिन होऊन श्रीहरि सज्जनांच्या हृदयप्रदेशांत निर्गूढ झाले; कलिकालप्रभावानें सर्व विश्व व्यामोहाक्रान्त झालें; आणि सन्मार्ग कंटकावृत झाला अशी परिस्थिति अवलोकन करून स्वभावतः जे सज्जन होते ते सत्यज्ञानाचा प्रकाश व्हावा ह्मणुन श्रीहरीचीं मोठ्या काकुळतेनें प्रार्थना करूं लागले. इतिहासपुराणादि विषयांत प्रवीण असलेल्या मध्यगेहाचार्यांचा मायावादावर विश्वास नव्हता; निर्गुण निराकार ब्रह्म त्यांच्या अंतःकरणाचें समाधान करण्यास समर्थ नव्हतें. मध्यगेहाचार्यांप्रमाणेंच अद्वैताविषयीं विश्वासरहित होऊन संशयग्रस्त झालेले सज्जन श्रीहरीची ठिकठिकाणीं प्रार्थना करूं लागले होते. अशी अनन्यभक्तीनें सेवा व प्रार्थना करणाऱ्या,

मध्यगेह व इतर सज्जन, यांच्या अंतःकरणांत श्रीहरि प्रकट झाले. एके वेळीं मकरसंक्रमणोत्सवांत श्रीहरींनीं आवेशमुखानें ( एका ब्राह्मणाच्या अंगांत आविष्ट होऊन ) श्रीमद्वायुदेवच पृथ्वीवर आतां लवकर अवतीर्ण होतील असें सर्व लोकांस सांगितलें. ती देववाणी श्रवण करून सकल सज्जन मंडळाला अत्यंत आनंद झाला. श्रीरामचंद्रांचे परमभक्त ह्मणून ज्यांचें माहात्म्य रामायणांत वर्णिलें आहे, आणि नंतर श्रीकृष्णावतारांत पांडवांच्या घरीं भीमसेन या नांवानें जे विख्यात झाले, व ज्यांनीं कलिरूप दुर्योधनाचा सपरिवार निःपात करून श्रीकृष्णाची निस्सीम सेवा केली, त्याच भारतीपती श्रीवायुदेवांनीं आतां श्रीमदाचार्यांच्या रूपानें पृथ्वीवर अवतरून व श्रीकृष्णद्वैपायनांचें सन्मत विशद करून तें सज्जनांना सांगण्याचा निश्चय केला. मणिमान्प्रभृति दैत्यसमूह पूर्वीं श्रीभीमसेनाकडून मारले गेले होते; त्यांनींच पुनः जन्म घेऊन मोहशास्त्रें निर्माण केलीं होतीं. त्या शास्त्रांच्या प्रचारानें देशभर विपरीत ज्ञानाचा प्रसार झालेला होता; या कारणानें ज्ञानयुद्धांत दुष्ट ज्ञानाचा संहार करण्यासाठीं श्रीमदाचार्यांचा अवतार होणें अवश्य झालें होतें. श्रीमदनंतेश्वर प्रभूंनीं आवेशपुरुषाच्याद्वारें प्रकट केलेला संदेश शिरसा मान्य करून मध्यगेहाचार्य सकुटुंब पाजकक्षेत्रास परत आले. श्रीहरिकृपेनें मध्यगेहाचार्यांची भार्या गर्भवती होऊन पूर्ण दिवस भरल्यावर तिला सर्वलक्षणसंपन्न व परमसुंदर पुत्र झाला. हेच आमचे चरित्रनायक श्रीमदानंदतीर्थ भगवत्पादाचार्य होत. [श्रीवायुदेवांना प्रसूत्यादि दुःखांचा संबंध नसल्यामुळें ते केवळ आविर्भूत झाले]. हा वृत्तांत ऐकून सर्व सज्जनांना अत्यंत आनंद झाला. त्याचें वर्णन करण्यास ज्ञान व बुद्धि हीं अगदींच

असमर्थ होत. तो कल्पनेनेंच जाणला पाहिजे. पुत्राच्या जन्मकालीं मध्यगेहाचार्य घरीं नव्हते. त्यांनीं दुंदुभीचा ध्वनि ऐकून पुत्रलाभाचें अनुमान केलें व ही पुत्रसंपत्ति देण्याची कृपा करणाऱ्या श्रीअनंतेश्वराचें गुणानुवर्णन करीत कृतकृत्य होऊन बऱ्याच वेळानें ते घरीं आले. मुलाचें सौंदर्य व तेजोविलास हीं पाहून त्यांच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचा प्रवाह सुरू झाला. इतर सर्व लोकांनाहि फार आनंद झाला. मध्यगेहाचार्य हे परम सत्पात्र ब्राह्मण असल्यामुळें सर्व लोकांस ते वंद्य झाले होते. ह्या नूतन बालकास दूध पाजण्यासाठीं ह्मणून, एका सद्ब्राह्मणानें त्यांस एक दुभती गाय दिली. जननाशौच संपल्यावर मंगलस्नान, पुण्याहवाचनादि विधिपूर्वक योग्य मुहूर्तावर त्या मुलाचें नांव " **वासुदेव** " असें ठेवण्यांत आलें. हें नांव अगदीं अन्वर्थक होतें. कारण ' वं ' ह्मणजे ज्ञान आणि असुदेव ह्मणजे प्राणदेव ह्मणजे ज्ञानविशिष्ट वायुदेव असा ह्या शब्दाचा अर्थ आहे. वायुदेवांचा हा अवतार केवळ ज्ञानावतारच होय. हा महाभाग्यशाली, दैवी संपत्तिवान् वासुदेव आपला उद्धार लौकरच करील असें सर्व सज्जनांना अंतःप्रेरणेनेंच वाटून अत्यंत आनंद झाला.

---

# भाग २ रा.

## बाळपण.

श्री अनंतेश्वराच्या कृपेनें झालेल्या ह्या शिशुचूडामणीची आयुराद्यभिवृद्धि व्हावी ह्मणून त्याला प्रभुचरणारविंदी समर्पण करून अनुग्रह संपादन करण्यासाठीं आपल्या कुटुंबपरिवारासह मध्यगेहाचार्य रजतपीठपुरास गेले. श्रीहरीचें दर्शन घेऊन व धूप, दीप, नैवेद्य वगैरे उपचारांनीं त्याचें पूजन करून, मुलाला सौख्य व्हावें अशी त्यांनीं प्रार्थना केली. रजतपीठपुराहून निघून पाजकक्षेत्रास परत येत असतां मार्गांत रात्र झाली. अरण्यमार्गानें येत असतां वाटसरांपैकीं एकाला रक्ताची वांति झाली. असें होण्याचें कारण काय याचा शोध करितां त्या मनुष्याला पिशाच्चबाधा झाल्याचें कळून आलें. त्या मनुष्याच्या आंगांत पिशाच्चाचा संचार होऊन तो ह्मणाला, "हे मार्गस्थ हो, भलत्या वेळीं अरण्यांतून संचार करणाऱ्या तुमच्या ह्या समाजांत असलेला हा बालक जर वायूदेव नसतां तर मी तुम्हांला सोडिलें नसतें." हें आवेशपुरुषाच्या मुखांतून निघालेलें भाषण श्रवण करून आश्चर्य आणि भीति यांनीं युक्त होऊन घाईघाईनें मध्यगेहाचार्यप्रभृति मंडळी आपापल्या घरीं सुखरूप येऊन दाखल झाली. हें बालक शुक्लपक्षींच्या चंद्राप्रमाणें दिवसेंदिवस वाढूं लागलें. त्याची निरोगी, दृढगात्रयुक्त, सुंदर, सुहास्यवदन, मूर्ति दिव्य कांतीनें इकडे तिकडे खेळत हिंडत

असतां परम शोभायमान दिसूं लागली. या विचित्र वत्सरत्नाला कडेवर खांद्यावर घेऊन खेळवून त्याचें चुंबन घेत, प्रेमाश्रु गाळीत, सर्व लोक मध्यगेहाचार्यांच्या महद्भाग्याची वाखाणणी करूं लागले.

ह्या शिशुरत्नाला क्षणभरही इकडे तिकडे न सोडतां कोणीना कोणी त्याला सदोदित अंगाखांद्यावरून खेळवीत असत. परंतु कांहीं जरूरीच्या कामामुळें मध्यगेहाचार्यांची स्त्री एके दिवशीं त्याला मुली-जवळ देऊन बाहेर गेली होती. आपलें माहात्म्य अंशतः तरी प्रकट करण्याच्या उद्देशानें हा वासुदेव एकाएकीं मोठमोठ्यानें किंकाळ्या फोडून रडूं लागला. बहिणीनें आपल्याकडून होईल तितकें त्याचें समा-धान करून पाहिलें, परंतु तो अधिकाधिकच रडूं लागल्यामुळें, तिचे सर्व उपाय हरले, शेवटीं तिनें त्या अर्भकाला भूक लागली असेल, अशा समजुतीनें खाऊं घालून पाहावें ह्मणून, आईनें घरीं करून ठेव-लेली हुलग्याची उसळ खाऊं घातली. वासुदेवानें ती एवढी तेवढी खातां पुष्कळच खाल्ली; मग तो गप्प बसला. चांगल्या तरुण माणसांना देखील हें धान्य विशेष खाल्लें असतां अस्वास्थ्य उत्पन्न होतें, परंतु वासुदेवाला त्यापासून लेशमात्र देखील बाधा झाली नाहीं. आई घरीं आल्यावर मुलीनें घडलेली सर्व हकीकत तिला सांगितली. ती ऐकून, आतां मुलगा अजारी पडेल ह्मणून, तिला फार भीति वाटली. पण ती भीति अगदीं व्यर्थ झाली. कारण त्या कुलित्थ-सेवनाचा त्याजवर कांहींच परिणाम झाला नाहीं. ह्या कुलित्थभो-जनानें वासुदेवानें भीमसेनावतारांतील आपला जाठरप्रभाव लेशतः प्रकट केला. वृक्षाचा प्रभाव बीजामध्यें असतो हें अंकुरोद्भ झाल्य वर कळून येतें. ह्या नियमाप्रमाणें वासुदेवानें आपलें माहात्म्य अल्प-

स्वल्प प्रगट करून " मी सामान्य बालक आहे असें समजूं नका " अशी जागृति सर्वांना करण्यासाठीं कांहीं कांहीं अपूर्व गोष्टी करून दाखविल्या. वासुदेव चालूं लागल्यावर एके दिवशीं एका तुफान झालेल्या बैलाचें शेपूट धरून त्याजबरोबर रानांत गेला. इकडे नेहमीं हंसत खेळत वावरणारें मूल कोठें दिसेनासें झालेलें पाहून घरचीं व गांवचीं सर्व माणसें त्याचा शोध करूं लागलीं. गांवांत कोठेंहि त्याचा पत्ता लागला नाहीं; तेव्हां मध्यगेहाचार्य व इतर लोक मोठ्या काळजींत पडले. रानांतून येणाऱ्या गुराखी मुलांनीं, एक मुलगा एका दांडग्या बैलाबरोबर अमक्या टिकाणीं खेळत आहे, असें सांगितल्यावर सर्वजण त्यांनीं सांगितलेल्या मार्गानें त्या स्थळीं जाऊन पाहतात तों वासुदेव बैलाचें शेपूट धरून लोंबत असलेला त्यांस दिसला. दरिद्री माणसाला चिंतामणि सांपडला, किंवा मुमुक्षूला श्रीहरीचें प्रत्यक्ष दर्शन घडलें ह्मणजे जसा आनंद होतो, तसा वासुदेवाला पाहून मध्यगेहप्रभृतींना आनंद झाला. त्याला आंगाखांद्यावर घेऊन आलिंगन देत, त्याचे मुके घेत व भगवंताच्या अचिन्त्याद्भुतशक्तीचें माहात्म्य वर्णन करीत सर्व लोक घरीं आले. मध्यगेहाचार्य पाजकग्रामांत वृत्तिस्वास्थ्य संपादन करून राहिले होते; तरी प्रपंचासाठीं त्यांना थोडेंबहुत लोकांचें देणेंही होतें. एकदां त्यांनीं एक बैल विकत घेतला होता, त्याची किंमत वेळेवर हातांत पैसा नसल्यानें दिली गेली नव्हती; ह्मणून बैलाचा मालक ती किंमत वसूल करण्यासाठीं मध्यगेहभटांच्या दारांत धरणें घेऊन बसला. तो स्वतः अन्न खाईना व मध्यगेहांसही खाऊं देईना; असा फार त्रास तो सावकार देऊं लागला. इतक्यांत घरांतून जेवावयास चला ह्मणून सांग-

ण्यास वासुदेव आला. तेव्हां मध्यगेहांनीं " सावकार मला कांहीं सोडीत नाहीं; तूं जेवून घे " असें सांगितलें. ज्ञानधन देऊन मुमुक्षु जनांचा संसारबंध सोडविण्यासाठीं अवतरलेल्या ह्या लोकोत्तर बालकानें एका विवक्षित जागीं जाऊन कांही चिंचोके आणिले व ते त्या सावकाराच्या हातांत दिले. तत्क्षणीं ते चिंचोके द्रव्यरूप होऊन ऋण प्रतिदत्त झालें ! तें धन घेऊन सावकार संतुष्ट झाला व आपण आज मुलाच्या प्रभावानें ऋणमुक्त झाला, असें मध्यगेहभट्टांना सांगून तो चालता झाला. ह्या पुत्राच्या योगानें मध्यगेहाचार्यांना केवळ आमुष्मिक सुखच प्राप्त झालें असें नाहीं, तर ऐहिक सुखलाभही पुष्कळ झाला, हें या गोष्टीवरून दिसून येतें. चार इतर मुलांप्रमाणें बोलून चालून, हंसून खेळून, क्लेश व आनंद प्रकट करून, तहानभूक दाखवून, वागणारा वासुदेव मधून मधून आपला महिमा दर्शविणारीं अद्भुत कृत्यें करूं लागला. हे मध्यगेहभट्टांचे चिरंजीव श्रीहरीच्या आराधनेंत निरत असलेले निस्सीम भक्त वायुदेव आहेत हें पुढील लहानशा गोष्टीवरून व्यक्त होतें. नडुवेरी नांवाच्या गांवीं आपल्या आप्तांच्या येथें विवाहसमारंभाकरितां मध्यगेहाचार्य आपल्या कुटुंबास व मुलास बरोबर घेऊन गेले होते. विवाहाच्या समारंभांत बंधुजन, अतिथि, सेवक वगैरे लोकांच्या गडबडींत आईचें किंचित् दुर्लक्ष होतांच वासुदेव अरण्यांत चालता झाला. कूडुवरच्या विष्णुमंदिरांत जाऊन त्यानेंदेवास नमस्कार केला तेथून ताळेकूडास जाऊन तेथील श्रीहरीचें दर्शन त्यानें घेतलें. ताळेकूडाहून तो रजतपीठपुरास गेला. तेथें पूर्वदिगालयांत श्रीहरीची सेवा करून वासुदेव पश्चिम देवालयास आला. इकडे नडुवेरी गांवीं विवाहांतील गर्दी थोडी

कमी होतांच वासुदेव कोठें तरी गेला हें मंडळीच्या लक्षांत येऊन ते त्याचा शोध करूं लागले. उत्तम पुरुषलक्षणानें संपन्न, विद्युल्लतेप्रमाणें चमकणारा, शुद्ध बावनकशी सोन्याप्रमाणें कांतिमान्, असा हा बालक आपल्या अद्भुतलीलाविलासांनीं सर्व बंधुजनास, अन्यजनांस आणि आगंतुक अभ्यागतांस, सारांश, डोळे असलेल्या सर्व लोकांस अत्यंत प्रिय झाला होता. तो एकाएकीं कोठें नाहींसा झाल्यामुळें सर्व लोकांना फारच वाईट वाटलें. चोहींकडे त्याच्या शोधासाठीं लोक गेले. त्यांपैकीं कांहींजण रजतपीठ पुरास आले. तेथें वासुदेवास त्यांनीं पाहिलें. नाहींसा झालेला वासुदेव दृष्टीस पडतांच जन्मांधाला दृष्टि प्राप्त झाल्याप्रमाणें सर्वांच्या आनंदास पारावार उरला नाहीं. त्याला प्रेमानें आंजारून गोंजारून "बाळा तूं येथें कोणाबरोबर आलास?" असें त्या लोकांनीं विचारिल्यावरून त्यानें सांगितलें कीं, "**कूडुवरचा** श्रीहरी **ताळेकूडा**पर्यंत व **ताळेकूडाचा** श्रीहरी येथील (**रजतपीठपुर**) पूर्वदेवस्थानापर्यंत आणि तेथील श्रीहरि या पश्चिम देवाळयापर्यंत मला घेऊन आला.' हें त्या बाळाचें बोबडें भाषण श्रवण करून लोक अत्यंत आश्चर्यचकित झाले. उत्प्रेक्षेनें सांगितलेल्या गोष्टी खोट्या नव्हत असें वासुदेवाच्या मुखविलासावरून व उत्साहावरून अनुमान करून प्रत्यक्ष श्रीहरींनींच येथपर्यंत मुलाबरोबर येऊन त्याचें रक्षण केलें असें लोकांना वाटलें. एकान्त भक्ताग्रेसर, नित्यापरोक्षी वायुदेव श्रीहरीशीं सदा अवियुक्तच आहेत. ही गोष्ट घडली त्यावेळीं वासुदेवाचें वय पांच वर्षांहूनही कमीच होतें असें वाटतें. कारण तोंपर्यंत त्याच्या अक्षराभ्यासालाही प्रारंभ झाला नव्हता. अक्षराभ्यास करण्याचा योग्य काल प्राप्त होतांच

मध्यगेहभट्टांनीं एक उत्तम मुहूर्त पाहून त्या शुभदिवशीं, तत्वतः विद्यापति असलेल्या, ह्या बालकाचें वास्तविक माहात्म्य न जाणतां " **ॐनमः** " हीं वर्णावलि पुनः पुनः लिहावयास लाविली. पहिल्या दिवशीं एकाद्या अज्ञ मुलाप्रमाणें वासुदेवानें हंसत खेळत ती वर्णावलि पाठ केली. दुसऱ्या दिवशीं पुनः मध्यगेहभट्ट त्याला आदल्या दिवशींचाच पाठ शिकवूं लागले, तेव्हां त्यानें " मला चर्वितचर्वण आवडत नाहीं" असें विनयानें त्यांस सांगून पूर्व दिवशींचा पाठ बिनचूक म्हणून दाखविला. त्यावरून वासुदेव एकपाठी असल्याचें सर्वांना कळून आलें. एके दिवशीं वासुदेव आपल्या आईबरोबर **घृतवल्ली** नांवाच्या गांवीं गेला असतां तेथें **धौतपट** वंशांतला **शिवभट्ट** नांवाचा एक ब्राह्मण पुराण सांगत होता. श्रोतृसमाज बराच जमला होता. माना डोल डोलवून श्रोते मंडळी तें पुराण श्रवण करीत असतां मध्येंच तो उपन्यास प्रवाह थांबवून एका विषयांत पुराणिकानें केलेली व्याख्या सत्सिद्धान्ताशीं विरुद्ध आहे असें वासुदेवानें प्रतिपादन केलें, आणि स्वतः त्या वाक्यांशाचा वास्तविक अर्थ सांगून सर्वांना संतुष्ट केलें. यावेळीं **मध्यगेहभट्ट** आपल्याच गांवीं होते. **वासुदेवानें** गांवीं आल्यावर घडलेला सर्व वृत्तांत त्यांना कळविला आणि आपलें म्हणणें खरें कीं शिवभट्टाचें म्हणणें खरें असें विचारिलें. तेव्हां **वासुदेवानें** सांगितलेलाच वास्तविक अर्थ होय असें **मध्यगेहभट्टां**नीं सांगितलें. पुढें एके दिवशीं **मध्यगेहाचार्य** स्वतःच पुराण सांगत असतां त्यांत लिकुच हें पद आलें. त्याचा अर्थ न सांगतांच त्यांनीं पुढील व्याख्यान चालू केलें. तेव्हां **वासुदेवानें** त्या पदाचा अर्थ गंभीर व मृदुवचनानें सांगितला. तें त्या बालकाचें व्युत्पत्तिकौशल पाहून सर्वजण फार

कौतुक करूं लागले. याप्रमाणें श्रीमदाचार्य झांकलेल्या माणकासारखे असून मधून मधून आपल्या अगाध बुद्धिमत्तेचा थोडा थोडा प्रकाश पाडीत परम मेधावी म्हणून विख्यात झाले. आणि मातापितर व सर्व सज्जन यांना प्राणापेक्षांही प्रिय होऊन अवतारकार्य करण्यास योग्य समयाची वाट पहात त्यांनीं उपनयनाच्या अगोदरचा काळ घालविला.

---

## भाग ३ रा.

### उपनयन व संन्यास.

" अष्टवर्षं ब्राह्मणमुपनयीत तमध्यापयीत " या विधीचें पालन होण्यासाठीं ज्योतिःशास्त्राला अभिमत असा एक उत्तम मुहूर्त निश्चित करून **मध्यगेहाचार्यांनीं** मोठ्या समारंभानें **वासुदेवाचें** उपनयन केलें. अलीकडे लोकांत उपनयनविवाहादिक विधींचें महत्त्व संगीत श्रवणोत्सवापुरतेंच दिसून येतें. परंतु **मध्यगेहाचार्यांनीं** केलेला **वासुदेवाचा** व्रतबंधसमारंभ या कोटींतला नव्हता. विधियुक्त प्रकारानें गायत्रीमंत्राचा उपदेश करून वेदारंभणसंस्कारपूर्वक ब्रह्मचर्याची प्राप्ति मध्यगेहाचार्यांनीं ह्या बटूस करून दिली. अवर्णनीय असें

विलक्षण ब्रह्मतेज त्या नूतन ब्रह्मचाऱ्याच्या मुखकमलावर जणूं काय नृत्यच करीत आहे असें त्यास पाहाणारांस वाटे. सुवर्णलतेप्रमाणें तेजः-पुंज दिसणारा वामन मूर्ति वासुदेव मोठ्या प्रेमानें नित्यशः सायंप्रात-रौपासनहोमहवनादि आश्रमोचित कार्यें करूं लागला. अलंकारांनाच अलंकारभूत झालेल्या करचरणादि अवयवांनीं होणाऱ्या वासुदेवाच्या लीला, त्याच्या सस्मित मुखकमलावर अभिव्यक्त झालेलें ब्रह्मचर्य तेज आणि नेहमीं यज्ञ करण्याचा अभ्यास असलेल्या दीक्षिताप्रमाणें निः-शंकपणें यथाशास्त्र मंत्रांचा स्पष्ट उच्चार करून " अग्ने नय सुपथ राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् " इत्यादि मंत्रांनीं अग्नीस प्रदक्षिणा व नमस्कार करणाऱ्या सर्वलक्षणसंपन्न ह्या विलक्षण बालमूर्तीस पाहून आमोदाविस्मयातिशयानें मूर्च्छाक्रांत झाल्याप्रमाणें सर्व लोक तटस्थ होत असत. कर्मलेपशून्य आणि विधिबंधनरहित श्रीहरि परमात्म्यानें देखील अवतार कालीं लोकशिक्षार्थ सदाचार मर्या-देचें अतिक्रमण न करितां मानवांत मानव स्वरूपी होऊन रामकृष्णादि रूपांनीं लीला केल्या ही गोष्ट लोकप्रसिद्धच आहे. त्याप्रमाणें जीवो-त्तम वायुदेवांनीं लोक निदर्शनासाठीं मंत्रतंत्र वगैरेचें परिपालन करून नित्य व नैमित्तिक कर्माचरण तिळभरही न सोडितां भगवल्लीलांचें अनुकरण केलें. पाजकक्षेत्रांत श्रीमदाचार्यांची स्मारक रूप अस-लेलीं **वासुदेवतीर्थादि** स्थानें यात्रेकरूंना दाखवितांना, त्यांनीं सर्पासुरास मारल्याचेंहि एक स्थान तेथील लोक दाखवीत असतात. बाल ब्रम्हचारी **वासुदेवाचार्य** हे पादचारी होऊन फिरत असतां एक राक्षस, सर्पाचें रूप धारण करून त्यांना दंश करण्याकरितां अगदीं त्यांच्या सन्निध आला. **वासुदेवाचार्यांनीं** त्याच्या भयंकर रूपास न

घाबरतां त्याला आपल्या पायाच्या अंगठ्यानें दाबून ठार मारिलें. रानावनांत साप निघणें किंवा त्यांना मारणें ह्यांत नवल मानण्या जोगें कांहीं नाहीं, परंतु हा साप सामान्य नव्हता. तो सर्व साधारण साप असता तर ह्या गोष्टीस इतकें महत्व येणें अगर तिची इतकी प्रसिद्धि होणें शक्य नव्हतें. भला मोठा, बहुवृद्ध आणि भयंकर फणा असलेला हा साप क्रोधवश होऊन फूत्कार करीत जोरानें उसळत येतांच हा सर्प वेषधारी असुरच आहे, असें निश्चयानें जाणून आठ वर्षे वयाच्या ह्या ब्रम्हचारी बालकानें घाबरून पळून न जातां किंवा त्याला मारण्यासाठीं दगड, काठी वगैरे साधनें शोधीत न बसतां, आपल्या अंगुष्ठप्रहारानें त्याचा संहार केला ! ह्या अद्भुत गोष्टीमुळें लोकांना अत्यंत आश्चर्य वाटलें असलें पाहिजे.

उपनयनविधीनें वेदाध्ययनास अधिकारी झाल्यावर **वासुदेवाला मध्यगेहाचार्यांनीं** एका गुरूच्या घरीं वेदवेदांगांचें अध्ययन करण्यासाठीं ठेविलें. हे गुरूजी **पूगवन** वंशांतले असून बहुशिष्यसंपन्न होते. ह्या पाठशाळेंत विद्याभ्यास करीत असतां गुरूजींच्या एका मुलावर—जो त्याच्या बरोबरीचा होता—वासुदेवानें चांगली कृपा केली. लोकसंग्रहासाठीं लोकरीतीस अनुसरून वागत असले तरी महात्मे सामान्य लोकांप्रमाणें फल-लालसेनें बद्ध होऊन वागत नाहींत. विरंचिकल्प आचार्य महोदयांना अज्ञ बालकांबरोबर घोकलेलाच पाठ घोकीत बसणें व क्षणशः कणशः विद्यार्जन करणें, पसंत नव्हतें; ह्मणून ते स्वेच्छेनें खेळत असत. पाठशाळेंत विद्येकडे दुर्लक्ष करून आपल्या बरोबरीच्या व आपल्याहून मोठ्या मुलांबरोबर नानाप्रकारें वादविहार करण्यांत वासुदेवाचा बहुतेक वेळ जात असे.

हनुमद् व भीम अवतारीं परिचित असलेलें उच्च व दीर्घ उड्डाण करणें, लांब पल्ल्याच्या धांवा मारणें, व दौडपकडीचे खेळ खेळणें, इत्यादि क्रीडा करून त्यांत ही वासुदेव मूर्ति रुवांना जिंकीत असे. पोहण्याच्या कलेंत तर ते अद्वितीय निष्णात होते. केवढ्याही बलाढ्य पैलवानानें वासुदेवाचार्यांचा हात कितीही घट्ट धरिला तरी तो हे एका क्षणांत सोडवून घेत असत; आणि उलटपक्षीं यांनीं जर कोणाचा हात धरिला तर तो सोडवून घेणें त्याच्याच्यानें होत नसे. याप्रमाणें सदोदित विविध क्रीडेंत मग्न आणि विद्या शिकण्याचें कामीं उदासीन असणाऱ्या वासुदेवास पाहून एके दिवशीं गुरूजी त्याजवर रागावले आणि पुनः असें न करण्याविषयीं त्यास सक्त ताकीद दिली. त्यानें गुरूजींस विनम्र भावानें सांगितलें कीं, मला ऋचा–अर्ध ऋचेचा पाठ घेऊन तीच ती पुनः पुनः पाठ करीत बसणें आवडत नाहीं. पाठ्य विषय एकवेळां म्हटला ह्मणजे बस्स झालें. असें सांगून सर्व पठितापठित ग्रंथ त्यानें उत्तम प्रकारें तेथल्या तेथेंच पाठ ह्मणून दाखविले. हें पाहून सर्वांना मोठें आश्चर्य वाटलें. वासुदेव एकपाठी व महामेधावी आहे अशी सर्वांची खात्री झाली. वासुदेवानें वेद, वेदांगें, साहित्य, व्याकरण, न्याय, मीमांसा इत्यादि विषयांचें अध्ययनही ह्या पूगवन कुलोत्पन्न गुरूजीजवळच केलें. ह्यांनीं अमुक इतकीं वर्षें अध्ययन केलें असा निश्चित काळ मध्वविजयांत सांगितलेला नाहीं. संन्यास घेण्यासाठीं अच्युतप्रेक्षाचार्यांजवळ राहाण्यास आल्यावेळीं वासुदेवाचें वय प्रायः सोळा वर्षांचें असावें. प्राथमिक शिक्षणाबरोबरच काव्य, व्याकरण, तर्क इत्यादि विविधशास्त्रांतही त्यांनीं उत्तम नैपुण्य मिळविलें. शिवाय वेदवेदांगें व उपनिषदें यांचें

अध्ययन करून गुरूजींना विलक्षण कीर्तीचा लाभ श्रीमदाचार्यांनीं करून दिला. याप्रमाणें सात आठ वर्षें वासुदेवाचार्यांनीं ब्रह्मचर्यावस्थेंत घालविलीं. गुरुजींचा मुलगा मस्तकशूलाच्या तीव्र व्यथेनें पीडित होऊन जन्मादारभ्य अत्यंत कष्टी होता. तें दयाळू वासुदेवाचार्यांनीं पाहून त्याच्या कानांत एक फुंकारा मारतांच तो मस्तकशूल मूलतः नष्ट करून त्या गुरुबंधूच्या दुःखाचा परिहार केला. ही वासुदेवानें गुरूजींना दिलेली ऐहिक दक्षिणाच होय. तसेंच ऐतरेयोपनिषदाचें अध्ययन करण्याच्या निमित्तानें त्याचा वास्तविक अर्थ श्रीमदाचार्यांनींच गुरुजींस निरूपण करून **गोविंदभक्ति** नामक मोक्षसाधनरूप महादक्षिणा दिली. याप्रमाणें गुरूजींस ऐहिक व आमुष्मिक विशेष फलप्राप्ति झाल्यामुळें ते कृतार्थ झाले. सज्जनांना सद्वैष्णवसिद्धांताचा उपदेश करून व अद्वैतादि शास्त्रखंडनपूर्वक भक्तिमार्ग प्रकट करून मुमुक्षुजनांचा उद्धार करण्यासाठीं अवतरलेल्या ह्या समीरप्रभूंनीं आतां आपल्या पौगंड व कौमार अवस्थेंतील लीला संपवून आपल्या अवताराचा मुख्य उद्देश साध्य करण्यास सुरुवात केली. इतक्या बालवयांत सांसारिक मोहाविषयीं पूर्ण विरक्त होऊन श्रीविष्णुपादांबुजांची निस्सीम भक्ति करूं लागलेले श्रीमदाचार्य हे विरक्त चूडामणि होत यांत शंका नाहीं. ब्रह्मचर्यपूर्वक सकळ विद्याग्रहण व नंतर समावर्तन संस्कार झाल्यावर आपला मुलगा गृहस्थाश्रम स्वीकारील, नातवां–पणतवांनीं आपलें घर भरेल, पांडित्य-प्रकर्षानें कीर्ति धनाची प्राप्ति हवी तितकी होऊन आपला वृद्धापकाळ सुखानंदांत व शांति-समाधानांत जाईल, अशी आशा सर्वच आईबापांची असणें अगदीं स्वाभाविक आहे. या नियमास मध्यगेहभट्ट आणि त्यांची धर्मपत्नी हीं कांहीं अपवाद

नव्हतीं. परंतु करुणानिधि श्रीमदाचार्यांचें मन सज्जनांची संकटावस्था पाहून द्रवल्यामुळें गृहस्थाश्रम स्वीकारल्यानें सन्मतस्थापना होणार नाहीं, असा त्यांचा निश्चय झाला. "काम्यानां कर्मणां न्यासं संन्यास कवयो विदुः" ह्या गीतोक्तींत सांगितलेल्या लक्षणांनीं सर्व काम्य-कर्मांचा परित्याग करून व भक्तिपुरःसर प्रेमसमुद्रांत निमज्जन करून सदा पुलकांकित गात्रांनीं ध्यानानंदामृतपान करीत श्रीमन्नारा-यणाला आपल्या हृत्कमलांत ठेवून, त्याला नमस्कार करून, त्याचें पूजन करून, भक्तिप्रेमोद्रेकजन्य आनंदाश्रुप्रवाहपूर्वक श्रीमदाचार्य नृत्य करीत. नित्य कृतार्थ व एकांतभक्त श्रीमद्वायुदेवांनीं भवतारकोपयोगी विरक्ति, भक्ति, उपासना आणि अपरोक्षज्ञान या साधनचतुष्टयाचा मोक्षप्राप्त्यर्थ उपदेश करून, ह्या अद्वैतघातक भक्तिमताचा प्रसार कर-ण्यास इतर आश्रम कांहीं योग्य नव्हेत; सर्वसंगपरित्याग ज्यांत होऊं शकतो, तो संन्यासाश्रमच आपल्या अवतारकार्यास अनुकूल आणि योग्य, असा निश्चित विचार ठरविला. दुष्टांचा निग्रह करण्याचें काम दुर्गादेवी करितेच; तेव्हां या ज्ञानावतारांत बाहुपराक्रम करावा लाग-णार नाहीं, असा विचार करून संन्यासाश्रमावरच सर्व भार त्यांनीं ठेविला. श्रीमदाचार्य हे सामान्य जनांपैकींच एक होते, असें ह्मणणा-रांनीं पुढील गोष्टींचा थोडासा विचार करून पहावें. हे वासुदेवाचार्य आईबापांना अत्यंत प्रेमास्पद होते, मुलांच्या संगतींत खेळण्याचें यांचें वय देखील संपलें नव्हतें, संसारांत धनवनितादि सर्व सुखें प्राप्त होणें यांना अगदीं सुलभ होतें, बालसंन्यासांत तर ऐहिक वैभवाचें नांवही नव्हतें. जहागिरी, इनामें आणि संपत्ति यांच्या मोहानें संन्यास घेण्याचा विचार ह्यांनीं केला असें म्हणावें तर तसाही प्रकार नव्हता, मठा-

धिपति म्हणून मिरवावें ही हावही त्यांना नव्हती, आईबापांनीं प्रतिबंध केल्यामुळें पोरखेळ म्हणून कांहीं त्यांनीं तो आश्रम स्वीकारिला नाहीं. तेव्हां भगवत्कलाविशेष असल्यावांचून सामान्य मनुजबालक याप्रकारें विरक्त होणें केवळ अशक्य होय असें प्रकृत गोष्टींवरून समजून येईल. उक्त प्रकारें चतुर्थाश्रमाची दीक्षा घेण्याचा निश्चय करून आपल्या मातापितरांस न सांगतांच वासुदेवाचार्य योग्य गुरूच्या शोधार्थ पाजकग्रामाहून निघून गेले. भगवदनुग्रह यांजवर पूर्ण असल्यामुळें मनोरथाची पूर्ति होण्यासाठीं वासुदेवाचार्यांना फार दूरवर भटकत जावें लागलें नाहीं. अच्युतप्रेक्षाचार्य नांवाचे एक यतिवर्य प्रवास करीत करीत रजतपीठपुरास येऊन तेथील श्रीअनंतेश्वराच्या देवालयांत राहिले होते. श्रीमन्नारायणाच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र सनक, सनंदन, सनातन आणि सनत्कुमार हे होत. ह्यांचे शिष्य दुर्वास, त्यांच्या शिष्यपरंपरेंत सत्यतीर्थ आणि त्या सत्यतीर्थांचे शिष्य प्राज्ञतीर्थ नांवाचे होते. त्या प्राज्ञतीर्थांचे शिष्य हे अच्युतप्रेक्ष होत. स्वतः अद्वैतशास्त्रांत प्रवीण असून त्यांच्या गुरूंनीं आपल्या देहावसानाचे वेळीं, अद्वैतमत चांगलें नाहीं, ‘ सोऽहं ’ ही उपासना कधींहि फलप्रद दोणार नाहीं, परमात्मा सर्व स्वतंत्र आहे, सर्व परतंत्र जीवांनीं त्याचीच आराधना करावी, असा रहस्योपदेश अच्युतप्रेक्षाचार्यांना केला होता. ह्या उपदेशाचें मनसा चिंतन करीत, संचाराच्या निमित्तानें ते रजतपीठपुरास येऊन श्रीअनंतेश्वराची सेवा करीत राहिले होते. पढलेलें शास्त्र आणि गुरूपदेशाचें रहस्य यांतील परस्पर विरोधी प्रकार पाहून अच्युतप्रेक्षांचें चित्त संशयग्रस्त झालेलें होतें. ह्या संदेहाची निवृत्ति

श्रीअनंतेश्वरावांचून कोणी करणारा नाहीं, असें जाणून त्याचा अनुग्रह होण्यासाठीं अच्युतप्रेक्षाचार्यांनीं त्या देवाची सेवा मोठ्या भक्तीनें चालविली होती. ह्या ऋषींनीं पूर्वजन्मीं पांडवांच्या घरीं द्रौपदीनें वाढलेलें अन्न भक्षण केल्यामुळें त्यांचें अंतःकरण शुद्ध झालें होतें. गंजम जिल्ह्यांत श्रीकूर्मक्षेत्रांत असलेल्या योगानंद नृसिंहाच्या देवालयांतील दगडी खांबावर कोरलेल्या पुढील श्लोकावरून ह्या यतिश्रेष्ठाचें माहात्म्य कळून येतें. तो श्लोक असा :—

" देवश्रीकमलाविलासलहरीपात्रं कलिप्रोन्मिलत्- ।
क्लेशक्लिष्टजनेऽखिले क्षितितले संलीनबोधोदये ॥
स्वीयश्रीपदपंकजैकशरणान् संरक्षितुं सन्मुनि- ।
र्जातः श्रीपुरुषोत्तमाभिधमहातीर्थः सुमत्यग्रणीः ॥ "

हा शिलालेख त्या देवाळयांत आजमित्तीसही आहे.

सारांश, अच्युतप्रेक्षाचार्य हे महापंडित असून, श्रीहरीच्या अनुग्रहास पात्र होते. ते अनंतेश्वराची सेवा करीत असतां श्रीहरींनीं एका आवेशपुरुषाच्या मुखानें ' सच्छिष्याच्याद्वारें तुझा व सर्व सत्पुरुषांचा लौकर उद्धार होईल ' ह्मणून वदविलेली वाणी श्रवण करून संतुष्ट अंतःकरणानें योग्य काळाची प्रतीक्षा करीत होते. अशा वेळीं श्रीमदाचार्य ह्या यतिवर्यांकडे आले आणि आपणांस संन्यासाश्रम द्यावा ह्मणून त्यांनीं त्यांची प्रार्थना केली.

इकडे मध्यगेहभट्ट मुलगा कोठें दिसेना ह्मणून दीनवाणीनें त्याच्या शोधार्थ घरून निघाले. शुद्ध सुवर्णाच्या कांतियुक्त लतेप्रमाणें चमकणाऱ्या मन्मथासारख्या पुत्राचें मुख, त्याचे आजानुबाहु, त्याचें

मंदहास्य, त्याची लोकविलक्षण बुद्धिमत्ता, आणि त्याचे नेत्रभ्रूविन्यास इत्यादि गोष्टी आठवून त्यांचें चित्त अत्यंत व्यग्र झालें. परमप्रिय एकुलता एक मुलगा नाहींसा झाल्यामुळें भयभीत झालेले मध्यगेहाचार्य शोध करीत करीत रजतपीठपुरास आले. श्रीअनंतेश्वराचे देवालयांत एका संन्याशाजवळ विरक्त होऊन गंभीरतेनें त्याची सेवा करीत असलेल्या वासुदेवाला पाहून मध्यगेहाचार्यांचें अंतःकरण संतोष व संताप यांनीं युक्त झालें. उतारवयांत मुलानें हात सोडिला ह्मणून त्यांना दुःख झालें. त्या आवेशांत ते वासुदेवाला रागें भरूं लागले. रागें भरून कांहीं उपयोग नाहीं, असें दिसून आल्यावर त्याला मध्यगेहाचार्यांनीं प्रेमळपणें बोधाच्या चार गोष्टी सांगून घराकडे येण्यासाठीं त्या वासुदेवाचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु दृढतर वैराग्यसंपन्न झालेल्या वासुदेवाला वडिलांचें म्हणणें अर्थातच समर्पक वाटलें नाहीं. त्यानें संन्यास सर्वथा घेऊं नये म्हणून पुष्कळ प्रकारें बोध केला तरी कांहीं उपयोग झाला नाहीं म्हणून दुःखानें परवश होऊन मध्यगेहाचार्यांनीं वासुदेवास प्रदक्षिणा करून नमस्कारही घातला. वडिलांनीं लहानांस नमस्कार करणें म्हणजे संन्यास घेण्यास अनुमति देणेंच होय असें त्या चतुर कुमारानें आपल्या पित्यास सांगून मनोहर मृदु भाषणानें त्यांचें समाधान केलें व परत पाजक-क्षेत्रास पाठवून दिलें.

पुत्राच्या सुमनोहर भाषणानें चकित व निरुत्तर होऊन आपल्या घरीं परत आल्यावर कांहीं कालपर्यंत पुत्रविरहजन्य दुःख कसें तरी सहन करीत मध्यगेहाचार्य पाजकग्रामींच राहिले. आतां वियोगदुःख त्यांना असह्य झालें, अन्नाहार सुटला, झोंप येईनाशी झाली, मुला-

च्या दिव्य मूर्तीची आठवण क्षणोक्षणीं करीत मध्यगेहाचार्य व त्यांची महासाध्वी पत्नी हीं उभयतः दुःखसमुद्रांत मग्न झालीं. क्षण युगाप्रमाणें होऊन भोजन विषवत् झालें. पुत्रवियोगदुःख सहन करणें अगदींच अशक्य होऊन मध्यगेहाचार्य पुनः त्याच्या भेटीसाठीं घरून निघाले. यावेळीं अच्युतप्रेक्षयतींद्र उडुपी येथें नव्हते. दक्षिणदेशीं आपल्या शिष्यासमवेत यात्रोद्देशें संचार करीत होते. मध्यगेहभट्ट दुःखाचे दीर्घ उसासे टाकीत पुत्राच्या शोधार्थ इतस्ततः भ्रमण करूं लागले. शेवटीं उडुपीपासून दक्षिणेस सुमारें चाळीस मैलांवर आधुनिक मंगळूर शहराजवळील नेत्रावती महानदी ओलांडून कायूरमार्गानें गेल्यावर कुत्यडि मठांत वासुदेव आपल्या गुरूसह असल्याचें त्यांना कळलें. तेव्हां मध्यगेहभट्ट त्या ठिकाणीं गेले. तेथें **वासुदेवा**ची भेट झाली. अतिशय संतापानें त्यांनीं मुलाशीं पुष्कळ वाग्वाद केला. तूं संन्यास घेशील तर मी प्राण देईन अशीही भीति मध्यगेहांनीं वासुदेवास घातली. परंतु अतिदृढवैराग्यसंपन्न झालेल्या वासुदेवाच्या अंतःकरणावर त्या भाषणाचा कांहीं एक परिणाम झाला नाहीं. वडिलांचा राग थोडा शांत झाल्यावर उत्तमाश्रम घेणाराला प्रतिबंध करणें उचित नव्हे हें वासुदेवानें त्यांना विनयानें विशद करून सांगितलें. मातापित्यांची अनुमति मिळविल्यावांचून चतुर्थाश्रम घेणें श्रीमदाचार्यांस मुळींच पसंत नव्हतें. पितृवश्य होऊन त्यांच्या आज्ञेंत राहाणें हा पुत्रधर्म असून त्याचें उल्लंघन करणें वासुदेवास सर्वथैव संमत नव्हतें. आपल्या मातापितरांना निराधार स्थितींत सोडून व स्वकार्यपरायणमात्र होऊन घरांतून निघून गेले असें कोणी समजूं नये अशी त्यांची इच्छा होती. आईचें पुत्रवात्सल्य

व पितृभक्ति यांचें महत्त्व ते पूर्णपणें जाणत होते म्हणूनच अत्यंत विनयानें त्यांनीं वडिलांचें सांत्वन केलें. आम्ही आतां वृद्ध झालों, तुजवांचून आमचें रक्षण या अवस्थेंत दुसरा कोण करणार? तरी त्वां संन्यास न घ्यावा असें मध्यगेहाचार्यांनीं वासुदेवास पुनः सांगितलें. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, तुह्मांला आणखी एक मुलगा होईल, तो तुमचें रक्षण उत्तम प्रकारें करील. तो जन्मास येईपर्यंत मी आश्रमांतर करणार नाहीं, असें अनेक परीनें वासुदेवानें मध्यगेहाचार्यांस सांगून पाहिलें पण त्यांचें समाधान कांहीं केल्या होईना. श्रीरामचंद्राच्या वियोगानें दशरथ राजाचीं पंचेंद्रियें शोकावेशानें निर्बल होऊन त्याला असह्य चित्तसंताप झाल्यामुळें मूर्छा येऊन त्याचें हृदय विदीर्ण झालें व तदंतर्गत प्राणदेव निघून गेले, हें उपाख्यान पुत्रवात्सल्याच्या योग्यतेची साक्ष देतें. पुत्रविरहाचें दुःख अनुभवी माणसांवांचून इतरांस कळणेंच शक्य नाहीं. मध्यगेहभट्टांनीं आपल्या परीनें पराकाष्ठेचा धीर धरिला तरी प्रबल सुतस्नेहापुढें तो धीर टिकाव धरीना. जन्मजन्मांतरीं तपश्चर्या करून श्रीहरिप्रसादानें कल्याणगुणाकर, दिव्य सुंदरांग मुलास सोडून घरांत यावज्जीव दुःखोच्छ्वास सोडीत राहाणें ही कल्पनादेखील त्यांना महा भयंकर वाटूं लागली. इकडे पाषाणाला देखील पाझर फुटेल अशा मृदु, मनोहर वाणीनें संन्यासासाठीं अनुज्ञा मागणाऱ्या वासुदेवालाही संन्यास नको असेंही ह्मणवेना. अशा स्थितींत ते किंकर्तव्यतामूढ होऊन क्षणैक स्तब्ध बसले. शेवटीं मध्यगेहाचार्यांनीं असा विचार केला कीं, आपण वासुदेवाला संन्यास घेण्यास परवानगी दिली तरी आपली भार्या कांहीं केल्या ती देणार नाहीं असें समजून ‘ तुझी आई तुला परवानगी देईल तर माझी कांहीं हरकत नाहीं ’ असें वासुदेवास त्यांनीं सांगितलें.

वासुदेवाचार्यांनीं मध्यगेहाचार्यांस पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्यांना ( वासुदेवाचार्यांना ) अनुजलाभ होण्याचा योग आला. त्यांची मातुश्री श्रीहरीसंकल्पानुसार गर्भवती होऊन यथाकालीं प्रसूत झाली. तिच्या उदरीं दुसरें एक पुत्ररत्न निर्माण झालें. हाच पुत्र पुढें विष्णुतीर्थ या नांवानें विख्यात होऊन सुब्रह्मण्यमठाचा अधिपति झाला. "नासंवत्सरवासिने प्रब्रूयात्" या न्यायानुसार श्रीमदाचार्य अनुजोत्पत्ति होण्याची मार्गप्रतीक्षा करीत एक वर्षपर्यंत अच्युतप्रेक्षाचार्यसन्निध त्यांची मनोभावें सेवा करीत स्वस्थ राहिले होते. नंतर अनुज जन्माची वार्ता कळून त्यांना फार आनंद झाला. आपल्या कार्यसिद्धीच्या मार्गांतला मोठा अडथळा दूर झाला; मातुश्रीस वंदन करून संन्यासग्रहणास तिची अनुज्ञा घेऊन परत गुरुचरणीं हजर व्हावें, या उद्देशानें वासुदेवाचार्य पाजकक्षेत्रास गेले. मातापुत्रांचा संवाद यावेळीं काय व किती प्रेमानें झाला असेल हें वाचकांनीं कल्पनेनेंच जाणावें! मातृस्नेह केवळ अवर्णनीय होय. सामान्यतः पशुपक्ष्यादिकांना देखील मुलें ह्मटलीं ह्मणजे प्राणापेक्षांही प्रिय असतात. प्रस्तुत तर आमच्या चरित्रनायकासारखा लोकोत्तर पुत्र होता, मग काय विचारावें? मन्मथ देखील लज्जित होईल, असें त्याचें रूपलावण्य होतें; बृहस्पतीनें देखील वंदन करावें, अशी त्याची बुद्धिमत्ता होती; त्याचें शिरीषकुसुमाप्रमाणें कोमल शरीर केवळ राजभोगांनाच योग्य होतें. अलंकारांनाच अलंकाराप्रमाणें शोभा देणाऱ्या ह्या दिव्यमंगलांग मुलाला सुंदर वस्त्राभरणांनीं भूषित करून त्याच्या विशालभालप्रदेशीं केशर कस्तुरीचा सुंदर तिलक लावावा, त्याचें लांब व कुरळे केंस विंचरावे, अनुरूप

गुणशील अशा वधूसह त्याला उत्तम आसनावर बसवून व मंगल गायनांनीं आशीर्वाद देऊन कृतार्थ व्हावें, ही आईची इच्छा कोणीकडेच राहिली! उलट अशा अलौकिक सुकुमारानें शिखासूत्रांचा परित्याग करून कौपीन व काषायवस्त्रें परिधान करावीं, उपासतापास व कठिण व्रतनियमाचरणानें कृश होऊन देशसंचार करीत असावें, हें पाहाण्याचें आपल्या नशिबीं आलें असें वाटून, ती साध्वी माता किती शोकसंतप्त झाली असेल याची कल्पनाच केली पाहिजे! इतकें झालें तरी परम वैराग्यानें यत्याश्रम स्वीकारण्यास अनुज्ञा द्यावी ह्मणून अत्यंत नम्रपणें वासुदेवानें वारंवार केलेल्या नमस्कारपूर्वक प्रार्थनेमुळें तिला त्याची विनंति अमान्य करण्याचें धैर्य होईना. हा माझा भाऊ आपणां उभयतांचें रक्षण उत्तम प्रकारें करील; काळजी करण्याचें कांहींएक कारण नाहीं; मला कधीं तरी पाहावें असें तुह्मांस वाटत असेल तर परवानगी द्यावी, नाहींपेक्षां माझें तोंडही तुमच्या दृष्टीस पडणार नाहीं, असें वासुदेवाचार्यांनीं आपल्या आईबापांस नम्रपणानें—पण दृढनिश्चयानें सांगितलें. तेव्हां आतां उपाय नाहीं असें पाहून मोठ्या कष्टानें त्यांनीं त्यास अनुमति दिली. नंतर वडीलमातुश्रींच्या आशीर्वादानें भूषित होऊन वासुदेवाचार्य त्वरेनें अच्युतप्रेक्षाचार्यांकडे आले; आणि विलंबी संवत्सराच्या आषाढ वद्य चतुर्थी या शुभ दिवशीं विध्युक्तमार्गानें त्यांजकडून संन्यासाश्रम घेऊन ते **परमहंस परिव्राजकाचार्य** झाले! अच्युतप्रेक्षाचार्यांनीं त्यांचें आश्रम नामधेय "**पूर्णप्रज्ञ**" असें ठेविलें. तें अगदीं यथार्थ झालें. भक्तिपरवश असलेल्या ह्या बाल संन्याशास अवलोकन करणाऱ्या सर्व सज्जनांच्या नेत्रांतून आनंदाश्रु वाहूं लागून

आज आपण कृतार्थ झालों, असें त्यांना वाटलें. देवगणांनीं तर आकाशांतून पुष्पवृष्टिच केली!!

---

# भाग ४ था.

## बालयतींद्राचीं अद्भुत कृत्यें.

श्रीमत्पूर्णप्रज्ञाचार्यांनीं यत्याश्रम स्वीकारल्या वेळीं त्यांचें वय किती वर्षांचें होतें याविषयीं इतिहासज्ञांत बराच मतभेद आहे. कित्येकांचें मत त्यांचा जन्म विलंबिसंवत्सरांत झाला असें आहे. विलंबीपासून पिंगल संवत्सरापर्यंत एकंदर ७९ वर्षें सहा महिने आणि वीस दिवस होतात. इतकीं वर्षें त्यांनीं यतिसाम्राज्याचें आधिपत्य केलें असें कांहीं विद्वान् म्हणतात. आश्रम घेतल्या वेळीं त्यांचें वय बहुतकरून सोळा वर्षांचें असावें असें कोणी कोणी म्हणतात.

गृहस्थाश्रमी माणसाप्रमाणें संन्याशानें एकाच ठिकाणीं फार दिवस राहूं नये असा शास्त्राचा नियम आहे. त्यास अनुसरून काशीयात्रेस जावें ह्मणून ह्या बालयतींद्रांनीं गुरूंची आज्ञा मागितली. इतक्या लवकर शिष्याचा वियोग अच्युतप्रेक्षाचार्यांना असह्य वाटणें अगदीं स्वाभाविक होतें. लोहचुंबक लोखंडास जसा आपल्याकडे आकर्षून

घेतो तसें श्रीमदाचार्यांनीं आपल्या सदाचार, भक्ति, वैराग्य, ज्ञान इत्यादि अनेक अमूल्य गुणांनीं व मुखकांति आणि वाग्गांभीर्य यांच्या योगानें लोकांच्या चित्तवृत्ति आपणांकडे आकर्षित केल्या होत्या. अशा शिष्यरत्नाला बाल्यदशेंत एकाकी, त्या काळीं परम दुर्घट असणाऱ्या काशीयात्रेस पाठविणें अच्युतप्रेक्षाचार्यांस पसंत वाटेना. हे गुरुशिष्य काशीयात्रेसंबंधानें बोलत असतां एका आवेषपुरुषाच्या मुखांतून देववाणी निघाली. " आजपासून तिसरे दिवशीं श्रीगंगानदीच येथें येणार आहे आणि अशीच ती प्रत्येक बारावे वर्षी एकदां येऊन या सरोवरांत प्रकट होईल. " अशी ती देववाणी होती. गुरूंची आज्ञा उल्लंघन न करितां श्रीमदाचार्यांनीं काशीयात्रेचा बेत तूर्त तहकूब केला. देशदेशांतरीं श्रीमदाचार्यांची कीर्ति पसरल्यामुळें अनेक पंडित व पामरजनांचे थवेचे थवे त्यांच्या दर्शनासाठीं प्रत्यहीं येऊं लागले.

न्यायशास्त्रांत पारंगत, अद्वैत वेदांतांत प्रवीण आणि बौद्ध पक्षपाती असे विद्वान् लोक आचार्यांचें पांडित्य श्रवण करून वादास तयार होत असत. आश्रम घेतल्यावर चाळिसाव्या दिवशींच तर्कशास्त्रशिरोमणि वासुदेवपंडित आपल्या विद्वान् शिष्यपरिवारासहवर्तमान येऊन आचार्यांशीं वाद करण्यास प्रवृत्त झाला. तीन दिवसपर्यंत अखंड उपन्यास करून वासुदेवपंडितानें वाक्पुंजकोलाहलानें सभेमध्यें आपलें पांडित्य प्रकट केलें. त्यावर आचार्यांनीं आपल्या वाग्बाणांचा प्रयोग करून अगदीं निरायासानें त्याच्या गर्वाचा परिहार केला. " त्रिदिनं य उपन्यासं व्यधात् विद्वान् निरंतरं । वैशेषिकाग्र्यो विजितो वासुदेवाह्वयोऽमुना ॥ " असें पंडिताचार्यांनीं श्रीमध्वविजयाच्या टीकेंत

दिलेलें प्रमाणवाक्य आचार्यांच्या प्रथम जयाचें वर्णन करीत आहे. वासुदेवपंडित आपल्या अनुयायांसहवर्तमान वादांत परास्त झाल्यामुळें त्यानें जयपत्र लिहून श्रीमदाचार्यांचे चरणीं अर्पण केलें.

परंपरागत क्रमानें व अभ्यासपाटवानें अच्युतप्रेक्षाचार्य अद्वैत मताचे थोडेसे पक्षपाती झाले होते, ह्मणून त्यांनीं इष्टसिद्धिनामक ग्रंथाचा पाठ आचार्यांस सांगण्यास प्रारंभ केला. अच्युतप्रेक्षाचार्य प्रथम श्लोकाचें व्याख्यान करीत असतां आचार्यांनीं आपल्या गंभीर वाणीनें त्या श्लोकांतील बत्तीस दोष दाखवून ग्रंथ अनारंभणीय आहे असें सांगितलें. अच्युतप्रेक्षाचार्य निरुत्तर होऊन स्तब्ध बसल्यामुळें सज्जनांना संशय पडला. स्वसिद्धांत समजावून सांगून तत्त्वोपदेश करण्याच्या आधीं पंडितांच्या विद्वत्ताहंकाराचें खंडन करणें ही मुख्य गोष्ट होय दुसरी पण अप्रधान गोष्ट ह्मटली ह्मणजे आपण ज्या मायावादशास्त्राचें अवलंबन केलें तें बरोबर नाहीं, अशी लोकांची समजूत होणें ही होय. याप्रमाणें सज्जनांचीं मनें परिपक्वदशेस आणून तत्त्वार्थ स्वीकार करण्यास श्रीमदाचार्यांनीं त्यांना पात्र केलें. अच्युत प्रेक्षाचार्यांनीं मौनभावाचा अंगिकार केला यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण श्रीमदाचार्यांचा वाक्प्रवाह थांबविण्यास देवादिकसुद्धां असमर्थ होते. मन्त्रस्तब्धसर्पाप्रमाणें वादिजनरूपी महामल्ल आचार्यांसमोर निरुत्तर होऊन ते पादाक्रांत होत असत.

सुवासिनी स्त्रियेला जसें मंगलसूत्र, त्याप्रमाणें वैष्णवांना परमप्रिय ग्रंथ ‘ श्रीमद्भागवत ’ हा एक आहे. पांच सहा शिष्यांना पांच सहा पोथ्या देऊन श्रीमदाचार्य भागवतसाराचा विचार करीत असत: “ सन्तति-

सम्पद्रामायणतः भक्तिविरक्ति भागवततः " हें अभियुक्तवचन लेशमात्र देखील असत्य नाहीं. सर्वोत्तम श्रीहरीची अंतःकरणापासून नमन-स्तवन वगैरे प्रकारांनीं आराधना करून धन्य झालेल्या भक्तिशिखा-मणींच्या चरित्रांचें अमूल्य भांडारच हा ग्रंथ आहे. लज्जा न धरितां पायांत चाळ बांधून नृत्य करीत श्रीकृष्णपरमात्म्याचें जगन्मोहन रूप आपल्या हृत्कमलांत ठेवून पुलकांकित झालेल्या गोपींप्रमाणें केलेली भक्ति श्रीकृष्णाच्या चरणकमलीं समर्पण करून कृतार्थ होणाऱ्या सर्व महनीय चरितांना हा ग्रंथ ह्मणजे एक भक्तिमधुकोशच होय असें वाटतें. शिष्यजन श्रीमद्भागवताचें अध्ययन करीत असतां प्रत्येक पुस्तकांत निरनिराळे पाठभेद असल्यामुळें खरा पाठ कोणता याविषयीं अर्थांतच संशय उत्पन्न होऊं लागला. तेव्हां श्रीपूर्णप्रज्ञाचार्यांनीं त्या पाठ भेदांपैकीं एका पाठास अनुसरून हाच श्रीवेदव्यासांना अभिमत असलेला पाठ होय, असें अनेक प्रमाणांतरांनीं संयुक्तिकपणें सिद्ध केलें. त्यावेळीं त्यांची ग्रंथोपस्थिति अवलोकन करून लोक आश्चर्य-चकित झाले. कांहीं लोकांनीं आचार्यांची परीक्षा घेण्यासाठीं त्यांना पंचमस्कंधांतील कांहीं प्रश्न विचारिले. तेव्हां त्यांनीं कोणत्याही पुस्तकाची अपेक्षा न करितां गंगाप्रवाहाप्रमाणें उपन्यास करून अर्थ-वैचित्र्य विशद करून दाखविलें. तें आचार्यांचें अमितपांडित्य पाहून इतक्या अल्प वयांत ह्यांनीं इतकें ज्ञान संपादन केलें तरी केव्हां! असें सर्व लोकांना वाटलें. जन्मांतरीं केलेला हा विद्याभ्यास, असें आचार्यांनीं सांगून लोकांची जिज्ञासा तृप्त केली. यांच्या पांडित्याची दररोज अभिवृद्ध होणारी कला पाहून अच्युतप्रेक्षाचार्य फारच संतुष्ट झाले. दिव्यसच्छास्त्राला खराखरा अधिकारी हा आपला शिष्य

आहे, अशी त्यांची खात्री झाली. वेदान्तराज्याचें परिपालन करण्यांत हे परमचतुर आहेत असें पाहून, दिव्यप्रभेनें शोभित अशा पूर्णप्रज्ञ यतिवर्यांवर असलेल्या प्रेमाधिक्यामुळें अच्युतप्रेक्षाचार्यांनीं त्यांना शंखजलाभिषेकपूर्वक "**आनंदतीर्थ**" हें नामाभिधान ठेवून युवराजपदावर आरूढ केलें. या वेळेपासून श्रीमदाचार्य 'आनंदतीर्थ' या नांवानें लोकांत प्रसिद्ध झाले. आनंदकरशास्त्राचे हे कर्ते म्हणून हें नांव त्यांना अन्वर्थक झालें होतें. "मध्वित्यानंदउद्दिष्टः वेति तीर्थमुदाहृतम्" असें 'मध्व' शद्बाचें निर्वचन करून तो शद्ब आनंदतीर्थ शद्बाचा पर्याय आहे, असें प्रतिपादन करण्यांत येतें.

श्रीमदानंदतीर्थाचार्यांच्या मठांत या वेळेपासून वाक्यार्थ विचाराचा उहापोह सारखा सुरू झाला. आगमाचें प्रामाण्य न स्वीकारतां केवळ प्रत्यक्ष व अनुमान या प्रमाणांनींच सर्व प्रमेयें सिद्ध होणें अशक्य असल्यामुळें आगमप्रामाण्य अवश्य मानलेंच पाहिजे, हें समजावून देण्यासाठीं श्रीमदाचार्यांनीं अच्युतप्रेक्षाचार्यांच्या दर्शनासाठीं आलेल्या एका यतीबरोबर वाद केला. हे अभ्यागत संन्यासी तर्कशास्त्रांत मोठे प्रवीण होते. आचार्यांना जिंकून कीर्ति संपादन करण्याच्या उद्देशानें तें आपल्या विद्वान् शिष्यपरिवारासहवर्तमान आलेले होते. नैयायिक लोक विशेषतः अनुमान-प्रमाणांत प्रौढ असतात. अनुमानाचें प्राबल्य–दौर्बल्य यांविषयीं विचार चालला असतां आचार्यांनीं अनुमानाचें कामचारित्व ( चांचल्य ) स्पष्टपणें सिद्ध केलें. प्रकृतनैयायिकशिरोमणि प्रपंचाचा भेद, अभेद, सत्यत्व किंवा मिथ्यात्व यांपैकीं एकही गोष्ट अनुमान प्रमाणानें सिद्ध करूं शकले नाहींत. प्रत्यक्ष किंवा आगम या प्रमाणांना अनुकूल असलेलेंच अनुमान प्रमाण

होऊं शकतें. तद्व्यतिरिक्त असणारी युक्तिकुयुक्ति होय, असें आनंदतीर्थाचार्यांनीं सुबोध रीतीनें समजावून सांगून आनुमानिकांच्या अहंकाराचें मर्दन केलें. " यावदेव प्रमाणेन सिद्धं तावदहापयन् । स्वीकुर्यान्नैवचान्यत्र शक्यं मानमृते क्वचित् ॥ " असें वामन—पुराणांत अनुमानाविषयीं ह्मटलें आहे. श्रीमदाचार्यांचा वाग्विलास आणि अनुमानशास्त्रांतील त्यांचें अपूर्व पांडित्य अवलोकन करून लोकांनीं **' अनुमानतीर्थ '** ही पदवी त्यांस अर्पण केली.

दिवा लावला कीं पतंग त्याच्या आसपास सहजच जमतात. श्रीमदाचार्यरूपी ज्योतीनें सर्व दिक्प्रदेशीं असलेल्या पंडितमन्य लोकांना आकर्षण करून त्यांचें औद्धत्यभस्मसात् करून टाकिलें. वासुदेव पंडितावर मिळालेला जय, इष्टसिद्धि ग्रंथाचें निराकरण, भागवत पांडित्य, यौवराज्याभिषेक आणि अनुमानतीर्थ पदवीची प्राप्ति, ह्या सर्व गोष्टींमुळें आचार्यांची कीर्ति देशदेशांतरीं पसरल्यामुळें विद्वान् ह्मणवून घेणाऱ्या सर्व लोकांना मोठी काळजी उत्पन्न झाली. आपलें तेज कमी न व्हावें म्हणून शेकडो विद्वान् लोक आपण होऊन त्यांच्याशीं वाद करून जय मिळविण्याच्या उद्देशानें दररोज आचार्यांकडे येऊं लागले. अशा आकर्षित झालेल्या पंडित मंडळांत अत्यंत प्रबल म्हणून विख्यात झालेले वादिसिंह आणि बुद्धिसागर या नांवाचे दोघे विद्वान् होते. वाद करून आमचा पराभव करणारा या जगतांत कोणी तरी आहे काय? अशा अभिमानवाक्यानें आपला मोठेपणा मिरवीत भूसंचार करून ते रजतपीठपुरास अच्युतप्रेक्षाचार्यांकडे आले. आपण वाद करण्यासाठीं आल्याचें त्यांना कळवून वाक्समरांत सामना करण्यासाठीं ह्या पंडितांनीं आह्वान केलें.

युवराज पदारूढ झाल्यापासून श्रीमदाचार्य आपल्या शिष्यपरिवारासमवेत आन्हिक पाठप्रवचन करीत दुसऱ्या मठांत रहात होते. वादिसिंह आणि बुद्धिसागर हे धूर्त पंडित वादास आल्याचें अच्युतप्रेक्षाचार्यांनीं त्यांस कळवून आपल्या मठांत बोलावून आणिलें. ह्या वेळीं झालेल्या वाग्युद्धसंभ्रमाचें यथार्थ वर्णन आम्हांस करतां येणें शक्य नाहीं; वादप्रसंगीं जे हजर होते व तो श्रोत्रानंदानुभव ज्यांनीं घेतला तेच तें करूं जाणोत. वादिसिंहानें शाखाभेदानुवादपूर्वक अठरा विकल्पांची मांडणी इतक्या विलक्षण चातुर्यानें केली कीं, आतां मध्वाचार्यांस एकही उत्तर देण्यास जागा नाहीं असें बहुतेक सर्व लोकांना वाटलें; परंतु श्रीमदाचार्यांनीं आपल्या अनुपम वाग्बाणांच्या प्रयोगानें या महामल्लांच्या सर्व युक्त्याभासांचें निमिषमात्रांत बिनतोड खंडन केलें. बौद्धवादी बुद्धिसागरही आपल्या मताच्या सत्यतेविषयीं वाद करून पराजित झाला. याप्रकारें हे दोघे पंडित उद्यां आम्ही तुमच्या कोटीवर प्रतिकोटि सांगूं असें म्हणून सभेंतून निघून गेले; आणि आतां वादांत जय मिळणें केवळ अशक्य आहे असें समजून परिवारजनांसहवर्तमान रात्रींच्या रात्रींच कोणास न कळवितां पळून गेले. " वैशेषिको विशेषज्ञो वादिसिंहाभिधो द्विजः । महीं विजित्य संप्राप्तो बौद्धाग्र्यं बुद्धिसागरम् ॥ खंडितस्तेन पांडित्यात्तत्पक्षापेक्षकोऽभवत् । श्रुत्वा मध्वस्य वैदग्ध्यं प्राज्ञौ तद्गुरुमूचतुः ॥ वादिनौ वादकामौ द्वौ भगवंस्त्वागताविति । बुद्ध्यब्धिर्बुद्धिमाश्रित्य परो वाग्मी कथां व्यधात् ॥ " असें पंडिताचार्यांनीं यासंबंधानें म्हटलें आहे. याप्रमाणें वादिमहामल्लांना जिंकल्यामुळें श्रीमदाचार्यांचें पांडित्य सर्वप्रसिद्ध होऊन

लोकांना ह्यांचे सिद्धान्तच खरे असा विश्वास वाटूं लागला. अशी कीर्ति मिळवून आपणांस मुख्य लक्ष्य असलेल्या शांकर शारीरक भाष्याचें खंडन त्यांनीं तेव्हांच केलें. वेदान्तविद्येला आधारभूत श्रीमद्बादरायणांचीं सूत्रें आहेत. ह्या सूत्रांना व्याख्यानरूप असलेलें शंकराचार्यांचें शारीरभाष्य हें अद्वैत्यांचें मुख्य बळ होय. हें परभाष्य दोषभरित आहे हें स्पष्ट करून सज्जनांच्या अंतःकरणांतील संशय, विपर्यय इत्यादि किल्मिष काढून श्रीहरीचें सर्वोत्तमत्व, तारतम्यज्ञान, विश्वाचें सत्यत्व इत्यादि श्रीबादरायणास अभिप्रेत असलेले श्रुत्युक्त सिद्धान्त स्थापन करून हरिभक्तीचा विशुद्ध महिमा वाढविणें हा श्रीमदाचार्यांच्या अवताराचा मुख्य उद्देश होता. आपले गुरु अच्युतप्रेक्षाचार्य, वडील मध्यगेहाचार्य आणि मठीय विद्वन्मंडल यांना, त्यांचीं मनें क्रमानें परिपक्व होण्यासाठीं, शारीरभाष्यवाक्यार्थाचें व्याख्यान करून त्यांतील दोषांचें स्वरूप आचार्यांनीं समजावून दिलें. हा उपदेशक्रम चालू असतां मध्यगेहभट्ट नित्य मठांत येत असत. श्रीमदाचार्यांचा वाणीविलास पाहून ते साश्चर्य आनंदानें रोमांचगात्र होत असत. उपन्यस्त सर्व दोष खरे आहेत असें सर्वांस खात्रीपूर्वक वाटलें परंतु सूत्रांचा वास्तविक अर्थ न कळल्यामुळें श्रोतृगणाच्या मनाची मोठी तळमळ होऊं लागली.

शांकरवाक्यार्थाला अपार्थ असें तुम्ही म्हणतां तर स्वतः या सूत्रांवर एक भाष्य करून दाखवा असें अच्युतप्रेक्षाचार्य व इतर यतिजनांनीं आचार्यांना आग्रहानें सांगितलें. कोणीं परिहासप्रेरित होऊन तर कोणीं तत्त्वार्थजिज्ञासेनें आदरपूर्वक भाष्य करण्यास सांगितलें. त्या सर्वांना आचार्यांनीं " ॐ " असें म्हणून अनुमति दिली.

---

# भाग ५ वा.



## रामेश्वरयात्रा आणि दक्षिणदेशसंचार.

" सुजनं व्यजनं मन्ये महावंशसमुद्भवम् ।
स्वपरिभ्रमणेनैव तापं हरति देहिनाम् ॥ १ ॥ "

असा एक सरस श्लोक लोक उदाहरणादाखल देत असतात. " महद्विचलनं नृणां गृहिणां दीनचेतसाम् । निःश्रेयसाय भगवन् कल्पते नान्यथा क्वचित् ॥ " असें भागवतांत आचार्यांनीं म्हटलें आहे. म्हणजे महात्मे देशसंचार जो करीत असतात तो केवळ लोकांच्या हृत्तापाचा परिहार करावा एवढ्याचसाठीं होय हें सर्वप्रसिद्धच आहे. दक्षिणदेशस्थ सज्जनांना दर्शन देऊन स्वसिद्धान्ताचें बीजारोपण करण्याची कृपा करण्यासाठीं अच्युतप्रेक्षाचार्यांसह वर्तमान श्रीमदाचार्य रजतपीठपुराहून संचारास निघाले. आरंभीं अनंतशयन येथील श्रीअनंतपद्मनाभ देवाचें दर्शन घेऊन ते रामेश्वरास गेले. तेथें रामेश्वरांतर्गत श्रीरघुनंदनाचें दर्शन घेऊन श्रीरंगादि तीर्थक्षेत्रें, त्यांनीं पाहिलीं. तेथून दक्षिणदेशाला प्रदक्षिणा घालून येण्याच्या उद्देशानें ते निघाले. श्रीमदाचार्यांनीं केलेल्या दिग्विजयांत हा संचाराचा प्रसंग प्रथमचाच होय. ह्या ( दक्षिण ) देशीं त्यांनीं फक्त एकदाच दिग्विजय केल्याचें कळतें.

ह्या संचारांत श्रीमदाचार्य विष्णुमंगलनामक स्थळास आले व तेथून अनंतशयनास गेल्याचें कळून येतें. हें विष्णुमंगलस्थान दक्षिणकानडा जिल्ह्यांतील कासारगोड तालुक्यापैकीं कासारगोड

कजब्यानजीकच आहे. कुमारमंगल आणि विष्णुमंगल अशीं दोन गांवें जवळजवळच आहेत. हीं कासारगोडाहून तीन मैलांवर आहेत. विष्णुमंगलाच्या उत्तरेस एक मैलावर कावुमठ नांवाचें गांव आजमितीसही प्रसिद्ध आहे. श्रीमदाचार्यांचे भाविशिष्य त्रिविक्रमपंडिताचार्य यांचें तें राहण्याचें ठिकाण होय. त्याच्या जवळच असलेलें कुंबळे नांवाचें स्थान जयसिंह राजाची प्रधान राजधानी होती. ह्या राजाचा वाडा अद्यापि तेथें आहे. हल्लीं त्याचे वंशज तेथें राहत असतात. विष्णुमंगल हें ठिकाण जयसिंह राजाच्याच राज्यांतलें होतें. कासारगोडच्या दक्षिणेस एक मैलावर श्रीमन्मध्वविजयांत सांगितलेली पयस्विनी ( चंद्रगिरि हेंही नांव या नदीला आहे. ) नांवाची नदी आहे.

विष्णुमंगल देवालयांत श्रीहरीची पूजा करून सज्जनांनीं भक्तिपूर्वक दिलेल्या भिक्षेचा स्वीकार करून श्रीमदाचार्यांनीं भक्तजनांवर अनुग्रह केला. भोजन झाल्यावर निमंत्रक गृहस्थानें परम आदरानें दोनशें केळीं श्रीचरणांपुढें ठेवून तीं भक्षण करण्याविषयीं विनंती केली. ती मान्य करून त्यांनीं तीं सर्व केळीं भक्षण केलीं. अंगुष्ठपरिमित जाठरदीप उदरामध्यें सदा प्रज्वलित असल्यानें हा आहार कांहीं आश्चर्यकारक नव्हे असें त्यांनीं या गोष्टीवरून लोकांच्या नजरेस आणिलें. भक्तीनें अर्पण केलेल्या नैवेद्याचा स्वीकार करणें हा भक्तजनांवर केलेला अनुग्रहच होय असें समजून सामान्य जनसमूहाच्याही मनांत विश्वास वृद्धिंगत व्हावा म्हणून ह्या अलौकिक भोजनानें श्रीमदाचार्यांनीं आपलें माहात्म्य स्वल्प प्रकट केलें. याप्रमाणें कोठें भोजनाधिक्यानें तर कोठें इतरांना असाध्य अशा उपोषणाधिक्यानें हे

मोठे अद्‌भुतकृत्यकारी आहेत असें दिसून आलें. पुढें संचार करीत करीत आचार्यमहोदय केरळ देशांत पयास्विनी नदीतीरास आले. तेथें दुर्गापूजन करून ते अनंतशयनास आले. श्रीमदाचार्य येथें अनंतपद्मनाभ देवाच्या दर्शनानें परम संतुष्ट झाले. ह्याच सुमारास शंकराचार्यांनीं स्थापिलेल्या एका मठाचे अधिपति विद्याशंकर नांवाचे एक यति रामेश्वराच्या यात्रेस जात असतां वाटेंत अनंतशयन येथें त्यांचाही मुक्काम होता. हे यति आद्य शंकराचार्यांचा दुसरा अवतार होत असें त्या मताचे लोक मानतात. ह्यांचें जन्मस्थल कुट्टुपुस्तूर ( अग्रांशुनूत्नोपपदाधिवासः ) हें गांव होय. श्रीमदाचार्य व विद्याशंकर यति यांची भेट प्रथमच अनंतशयनास झाली. ह्या यतींच्याबरोबर पुष्कळ अनुयायिजन असून मठाधिपतीस योग्य असा सर्व थाट होता. आपण एक पीठाधीश असून अद्वैत मताचे नायक आहों अशा अहंकारानें ते यति दंभशून्य, पूर्ववयस्क व कौमारसंन्यासी अशा श्रीमदाचार्यांची योग्यता न जाणतां त्यांशीं वाद करण्यास प्रवृत्त झाले. वादांत विद्याशंकर सर्वथैव पराजित झाले. आचार्यांनीं शांकरभाष्यांतील दोषपुंजाचा अनुवाद करून त्याचें खंडन केलें. स्वतः भाष्य न करितां दुसऱ्यांच्या भाष्याचें खंडन करणें व्यर्थ होय असें विद्याशंकर म्हणाले. त्यांना स्वतंत्र सूत्रभाष्य करण्याचा आपला कृतनिश्चय आचार्यांनीं लागलीच कळविला. वाक्यार्थांत पराजित झाल्यामुळें विद्याशंकर प्रभृतींनीं " शेषं कोपेन पूरयेत् " याप्रमाणें संतापून अवाच्य शब्दोच्चार करून कलहाचा यत्न केला. अनंतशयन राजधानींत तीर्थक्षेत्रांचें दर्शन घेऊन " तीर्थीकुर्वंति तीर्थानि " या प्रमाणवाक्यास श्रीमदाचार्यांनीं दार्ढ्य आणिलें.

या क्षेत्रांत कांहीं दिवस राहून आचार्य कन्याकुमारी, रामेश्वर वगैरे ठिकाणीं गेले. तेथें समुद्रस्नान करून श्रीरामाच्या चरणकमलांचें भजन करीत प्रवास करीत असतां पुनः विद्याशंकरयतींची भेट झाली. हे यति अनंतशयनास झालेल्या पराजयानें संतप्त होऊन कोणत्याना कोणत्या तरी उपायांनीं मध्वाचार्यांचा मानभंग करावा अशी संधि पाहात होते. एके दिवशीं श्रीमदाचार्य समुद्रस्नानास जात असतां विद्याशंकरांची भेट झाली. उभयतांचा संवाद होऊन आचार्यांनीं यतींस सांगितलें कीं, मी वादांत पराजित झालों तर आपला दंड मोडून संन्यासाश्रम सोडून देईन; याप्रमणें तुम्हाही केलें पाहिजे; हें तुम्हाला कबूल नसेल तर तुम्हाला मिथ्यावादी म्हणावें लागेल. हें भाषण ऐकून विद्याशंकर आपल्या लौकिकासाठीं आचार्यांशीं पुनः वादास सिद्ध झाले; परंतु वादाचा परिणाम अनंतशयन येथें झालेल्या वादाप्रमाणें विद्याशंकरास प्रतिकूल झाला. तेव्हां विद्याशंकरांनीं इतर विद्वानांची मदत मागितली. ह्यांच्या न्यायाभासाला पंडितांनीं मान्यता देण्याचें नाकारिलें. श्रीमन्मध्वाचार्यांच्या चरित्रांत इतर वादीजनांवर मिळविलेल्या विजयाचें महत्त्व आणि विद्याशंकरावर मिळविलेल्या विजयाचें महत्त्व यांत महदंतर आहे. इतर वादी लोक पराजित होतांच श्रीआचार्यचरणीं शरणागत होऊन त्यांचें शिष्यत्व आनंदानें पत्करीत असत. विद्याशंकरयतींना तसें करणें अर्थातच योग्य वाटलें नाहीं व वाटणें शक्यही नव्हतें. त्यांनीं द्वेषवृद्धि करून आचार्यांस उपद्रव देण्यास सुरुवात केली. नियतव्रताची दीक्षा घेऊन श्रीमदाचार्य चातुर्मास्याकरितां रामेश्वरासच राहिले. त्यांचा व्रतभंग करण्यासाठीं परमठीयांनीं त्यांना पुष्कळ उपद्रव दिला. परंतु त्यांची

दुरिच्छा सिद्ध झाली नाहीं. द्वेषी लोकांचे श्रम मात्र व्यर्थ गेले. महात्म्यांना त्रास दिल्याच्या दुर्लौकिकाचे मात्र हे धनी झाले या विषयीं.

" अप्राश्वाद्याश्च तत्रोषुः चातुर्मास्यं ततो विभोः ।
दीक्षाविघ्नं चिकीर्षन्तस्ताडनं चाभवत्खलु ॥ "

हें प्रमाणवाक्य पंडिताचार्यांनीं आपल्या टीकेंत दिलें आहे.

चातुर्मास्य झाल्यानंतर परत रजतपीठपुरास येत असतां मार्गांत श्रीरंगनाथाच्या दर्शनासाठीं कावेरी नदीच्या तटाकीं असलेल्या श्रीरंगक्षेत्रास आचार्य आले. विद्याशंकरयतींना जिंकलेला तरुण संन्यासी अशी श्रीमदाचार्यांची कीर्ति अग्रदूताप्रमाणें ते येण्यापूर्वींच येऊन पोहोंचल्यामुळें ठिकठिकाणीं लोकांनीं त्यांचें परम आदरपुरःसर स्वागत केलें. श्रीरंगनाथाचें दर्शन घेऊन आचार्य उत्तरेकडे पयस्विनी नदीच्या तीरीं असलेल्या एका देवालयांत गेले. त्या गांवच्या लोकांनीं आचार्यांच्या मुक्कामीं एक मोठी सभा भरविली. त्या सभेंतील एका वृद्ध पंडितानें ऐतरेय सूक्तांतील कांहीं भाग काढून पूर्वपक्षाचा उपन्यास केला व त्याचा अर्थ सांगा म्हणून आचार्यांना आव्हान केलें. त्यांनीं लागलीच सूक्तसंहिता गंभीर सुस्वरानें पठन करून तिचा अर्थ सांगितला. वेदामध्यें प्रत्येक शब्दाचे तीन, भारतांत प्रत्येक शब्दाचे दहा आणि विष्णुसहस्रनामांत प्रत्येक नांवाचे शंभर अर्थ आहेत असें आचार्यांनीं निरूपण केलें. तें ऐकून जमलेल्या पंडितांपैकीं कांहींजणांनीं श्रद्धेनें व कांहींजणांनीं एका शब्दाचे शंभर अर्थ कांहीं ह्यांना सांगतां येणार नाहींत, आणि असें झालें म्हणजे त्यांची हुर्यो करावी अशा कपटोद्देशानें विष्णुसहस्रनामाच्या शब्दांचे शंभर अर्थ सांगावे अशी

आचार्यांस प्रार्थना केली. ती मान्य करून त्यांनीं सहस्रनामांतल्या पहिल्या ' विश्व ' शब्दाचे अर्थ सांगण्यास प्रारंभ केला. आचार्यांच्या मुखांतून, गंगानदीच्या प्रवाहाप्रमाणें निघणारा अर्थप्रवाह पाहून सर्व लोक चकित झाले. ते अर्थ लक्षांत ठेवण्यास देखील आपण असमर्थ आहों हें पंडितांस कळून ते लज्जित झाले. आचार्यांनीं अर्थनिरूपण चालविलेंच होतें; पण त्याचे विन्यासप्रभेदही समजेनात अशी जमलेल्या मोठमोठ्या विद्वानांची स्थिति होऊन त्यांचा व्युत्पत्तिविषयक अभिमान नष्ट झाला. तेव्हां सर्वांनीं विनम्रभावानें ' क्षम्यताम् ' म्हणून श्रीमदाचार्यचरणांची क्षमा मागितली. ही गोष्ट जेथें घडली तें पयस्विनीतीरावरील कोणतें क्षेत्र हें श्रीमन्मध्वविजयावरून निश्चितपणें कळत नाहीं.

श्रीरंगयात्रेनंतर श्रीमदाचार्य श्रीमुष्णक्षेत्रास गेले. तेथून त्यांनीं भूवराहसन्निधानप्रदेशीं प्रवास केल्याबद्दल ऐतिह्य प्रमाण आहे. ह्या क्षेत्रांत " दंडतीर्थ " या नांवाचें एक विख्यात तीर्थ आहे. हें श्रीमदाचार्यांनीं निर्माण केलेलें तीर्थ होय. आपल्या पूर्वाश्रमीं गुरूंच्या शेतीच्या उपयोगाकरितां दंडमाहात्म्यानें एक तीर्थ पाजकक्षेत्राजवळ श्रीमदाचार्यांनीं निर्माण केलें आहे हें मागें सांगितलेंच आहे.

रामेश्वराहून निघून श्रीमदाचार्यांची स्वारी पुनः रजतपीठपुरास येईपर्यंत मार्गांत पुष्कळ ठिकाणीं विद्वत्सभा झाल्या. आचार्य श्रीमुष्ण क्षेत्राहून निघून पयस्विनीच्या तीरावर दुसऱ्या एका ठिकाणीं आले असतां एका देवालयांत वस्तीस राहिले होते. एका विद्वन्महासभेचीं अधिवेशनें तेथें होत होतीं. विविध विषयांत परीक्षा

देऊन आपापल्या योग्यतेनुसार संमानदक्षिणा संपादन करण्यासाठीं केरळ देशचे अनेक मोठमोठे पंडित आलेले होते. त्यांतील एकानें सूक्तार्थासंबंधानें प्रश्न केला. हा विषयविचार चालला असतां, आग्रहानें असो किंवा पक्षपातानें असो, शहाणे शहाणे म्हणविणारे पंडित त्या शब्दांतील प्रतिपदिकप्रत्ययसंबंधांत देखील अनभिज्ञ माणसाप्रमाणें बोलूं लागले. " न वा उ देवाः क्षुधमिद्वधं ददुरुताशितामुपगच्छन्ति मृत्यवे " ह्या सूत्रांतिल " पृणीयात् " या पदाच्या अर्थाचा विचार सुरू झाला. हें रूप, ' पृण दाने ' एतत् प्रकृतिमूलक म्हणून आचार्यांनीं सांगितलें असतां " प्रीङ् प्रीणने " एतत् प्रकृतिमूलक म्हणून जमलेले व्युत्पन्नशिखामणि वाद करूं लागले. " कन्यावारयती सीममपीश्रुताविदत् " ह्या सूक्तांतील ' अपाला ' शब्दाच्या अर्थाचा विचार चालू झाला. तेव्हां आचार्यांनीं ' अपाला नवयौवना ' असा अर्थ सांगितला. प्रतिपक्षाचे लोक ' अपाला ' म्हणजे कुष्ठरोगी असा संदर्भविरुद्ध अर्थ सांगून तोच खरा म्हणून आग्रह धरून बसले. हें पाहून आचार्यांनीं त्या लोकांस लवकरच एक विद्वान् गृहस्थ येतील त्यांजकडून या शब्दाचा अर्थ तुम्हांस कळेल असें सांगितलें. त्याप्रमाणें कांहीं दिवसांनीं एक पंडित तेथें आले. लोकांनीं ' अपाला ' शब्दाचा अर्थ त्यांस विचारिल्यावरून आचार्यांनीं सांगितलेलाच अर्थ त्यांनींही सांगितला. यावरून श्रीमदाचार्य त्रिकालज्ञानी आहेत ही गोष्ट सर्वांना कळून आली. ह्याप्रमाणें ठिकठिकाणीं श्रुत्यर्थविचारद्वारा सत्यज्ञानाचा प्रकाश करीत व सज्जनांच्या अज्ञानसंशयादिकांचें छेदन करीत अनुपम कीर्तिसंपन्न होऊन श्रीमदाचार्य आपल्या गुरुसहवर्तमान हा रामेश्वरयात्रेचा प्रथमसंचार आटोपून रजतपीठपुरास परत आले.

---

# भाग ६ वा.



## श्रीवेदव्यासदर्शन व श्रीकृष्णप्रतिमालाभ.

भविष्योत्तरपुराणांत श्रीमन्महाभारताला—

" ऋग्यजुःसामाथर्वाश्च मूलरामायणं तथा ।
भारतं पंचरात्रं च वेदा इत्येव शब्दिताः ॥ "

असें वेदासारखें प्रामाण्य सांगितलें आहे. किंबहुना वेदापेक्षांही भारताचें महत्त्व अधिक आहे असें ज्ञानी लोक म्हणतात. श्रीमन्महाभारतामधलि वासुदेवार्जुनसंवादरूप श्रीमद्भगवद्गीता हें पारिजातमधुप्रमाणें एक अत्युत्तम रत्न आहे. श्रीहरिच सर्वोत्तम आहे, जीव परतंत्र आहे, श्रीहरिप्रसादच पुरुषार्थ कैवल्यप्रद आहे, मानवांनीं श्रीहरीची अव्यभिचारिणी भक्ति करावी, हें भारताचार्यांस सम्मत असलेलें वेदान्ताचें खरें हृद्गत विषद करून आचार्यांनीं श्रीमद्भगवद्गीतेचें भाष्य केलें. ह्यांनीं गुंफिलेल्या सदतीस ग्रंथरत्नमालेंतील पहिलें रत्न हें गिताभाष्य होय. शंकराचार्य व रामानुजाचार्य यांनीं केलेलीं भाष्यें अवलोकन करून श्रीमदाचार्यांच्या वाग्विन्यासाचा विचार केला तर निःपक्षपाती जनांना त्यांतील तारतम्य सहज दिसून येईल. आचार्यांचे सर्व ग्रंथ अत्यन्त संकुचित वाक्यात्मक आहेत; परंतु तीं वाक्यें भावसंभरित आहेत हें सर्व विद्वन्मंडलास मान्य आहे. उत्प्रेक्षा, अलंकार, चमत्कार, वाग्जालविशेषणांनीं पामरजनांचें मनोरंजन करण्याचा श्रीमदाचार्यांचा उद्देश सर्वथा नसल्यामुळें केवळ शास्त्रांचा खरा खरा अर्थ समजावून देण्यासाठीं त्यांनीं संक्षिप्त

शब्दांची योजना आपल्या ग्रंथांत केली आहे. प्रवचनोपयोगी व स्मरणोपयोगी कांहीं कांहीं अंशांचें मात्र अभिलेखन करून वाचा-प्रवचनानें त्यांचें सविस्तर पुष्टीकरणपूर्वक निरूपण करण्यासाठीं निर्माण झालेले आचार्यांचे ग्रंथ रत्नशकलांच्या समूहाप्रमाणें दिसतात. श्रीजयतीर्थाचार्यांचा अनुग्रह झाला नसता तर आचार्यांच्या वाक्याचा अन्वय लावतां येणें देखील अशक्य झालें असतें. श्रीमदाचार्य आपला दक्षिणदेशांतील संचार आटोपून रजतपीठपुरास आल्यापासून उत्तरदेशीं प्रयाण करावयाच्या उद्देशानें गुरु अच्युतप्रेक्षाचार्य ह्यांची अनुज्ञा मागण्याचा विचार करूं लागले. गुरु-शिष्यांचें प्रेम परस्पर अत्यभिवृद्ध झाल्या कारणानें आपला वियोग गुरुजींस असह्य होईल, तेव्हां विरहकालाचें स्मारक म्हणून एक ग्रंथ तयार करावा आणि तो त्यांचे सेवेस अर्पण करावा म्हणजे त्यांना थोडें तरी समाधान वाटेल, ह्या प्रशंसनीय हेतूनें त्यांनीं श्रीगिताभाष्य हा ग्रंथ तयार केला. तो अच्युतप्रेक्षाचार्यांचे चरणीं अर्पण करून श्रीमदाचार्यांनीं बदरिकागमनास आज्ञा व्हावी म्हणून त्यांना प्रार्थना केली. ती ऐकून बराच वेळ विचार केल्यावर त्यांनीं अनुज्ञा दिली. " श्रीहरिकार्यनिर्वाहासाठीं जाणाऱ्या ह्या शिष्यशिरोमणीला आपण प्रतिबंधक होऊं नये; सज्जनांचा उद्धार लवकर व्हावा; स्वतःला वियोगजन्य दुःख होईल म्हणून केवळ स्वहितपरायण होऊन त्यांच्या आड येणें उचित नव्हे; " असें जाणून " जाऊन यावें " अशी आज्ञा अच्युतप्रेक्षाचार्यांनीं श्रीमदाचार्यांस केली. याप्रमाणें गुरूंची अज्ञा घेऊन आचार्य उत्तरेकडे जाण्यास निघाले. गंगानदी ओलांडून ते श्रीमन्नारायणाश्रमांत गेले. तेथें

आपण केलेला गीताभाष्यग्रंथ त्यांनीं श्रीचरणीं अर्पण केला. हें नारायणाचें देवालय बदरीहिमाचलाच्या मधोमध आहे. या ठिकाणीं मनुष्यसंचार होणें फार दुर्घट आहे. ह्याच्याही वरच्या भागांत अदृश्य असा बादरायण बदरिकाश्रम आहे. श्रीनारायणाश्रमांत आचार्यांनीं गीताभाष्याचें पारायण श्रीनारायणाजवळ एकान्तांत केलें. ह्या भाष्यरत्नाचा स्वीकार करून श्रीमन्नारायणांनीं त्याचा सर्वत्र प्रचार करण्यास त्यांना आज्ञा केली. " गीतार्थं वक्ष्यामि लेशतः " असें श्रीमदाचार्यांनीं ह्या भाष्यांतील मंगलाचरणाच्या पद्यांत म्हटलें आहे. शिष्याच्या अल्पबुद्धीस अनुसरून " लेशतः " हें पद असूं देण्यासही श्रीनारायणांनीं सांगितलें. नित्य प्रातःकालीं स्नानादि आन्हिक कर्में वगैरे आटोपून ग्रंथपठनोत्तर आचार्य अध्यापनाच्या कामास सुरुवात करीत. ह्या आश्रमांत असतांना आचार्यांनीं श्रीहरिप्रसाद व्हावा म्हणून एक मण्डल म्हणजे अठ्ठेचाळीस दिवसपर्यंत काष्ठमौनव्रतानें उपोषणें केलीं. श्रीमद्बादरायणाचें दर्शन होऊन त्यांची सेवा आपल्या हातून व्हावी हाच त्यांचा मुख्य मनोरथ होता. बादरायणाच्या उपदेशबलानें लोकांमध्यें तत्त्वार्थाचें प्रकाशन करावें हा भावी कार्यगौरव मनांत धरून काष्ठमौनव्रतादि तपश्चर्या आचार्यांनीं केली. यापूर्वीं कांहीं ठिकाणीं वाग्वाद झाले. अनेक मतांचें खंडनही श्रीमदाचार्यांनीं केलें होतें; परंतु तें सर्व विशिष्ट स्थलीं झालें. त्यांचा सार्वत्रिक प्रचार झालेला नव्हता. तो करण्यासंबंधांत श्रीहरिसंकल्प काय आहे तो कळून यावा एतदर्थ स्वतः शुद्धांतःकरण असतांही आणखी विशेष तपाचरण करून त्यांनीं श्रीहरीची सेवा केली. दुनियेंत मात्सर्यानें म्हणा किंवा आपली ख्याति व्हावी

म्हणून म्हणा कांहीं कांहीं लोक लौकरचं नवीन मार्गांचे संस्थापक असे स्वतःस म्हणवून घेतांना दृष्टीस पडतात. तसा प्रकार ह्या आचार्यवर्यांचा नव्हता. सज्जनोद्धार हेंच केवळ एक त्यांचें ध्येय होतें; आणि म्हणूनच त्यांनीं तपोनिष्ठतेनें श्रीहर्यनुज्ञा संपादून द्वैत मतांचा प्रकाश केला. वर सांगितल्याप्रमाणें श्रीमदाचार्य तपोनिष्ठ असतांना एके रात्रीं श्रीमद्बादरायणांनीं, वरच्या भागीं असलेल्या, मनुष्यांना अगम्य व पामर दृष्टीस अदृश्य अशा आपल्या आश्रमांत यावें म्हणून बोलावलें. ती आज्ञा शिरसा मान्य करून श्रीहरिसेवेमध्यें नित्य आनंदपूर्ण असलेले श्रीमदानंदतीर्थभगवत्पादाचार्य विशेष आनंदानें सूर्योदयाच्या वेळेस त्या पुण्याश्रमास गेले. मौनव्रत असल्या कारणानें जातांना त्यांनीं " हें स्थल परम पवित्र असून श्रीहरि हाच सर्वोत्तम हा आमचा सिद्धान्त सत्य आहे. सज्जनहितार्थ आम्ही श्रीमद्वेदव्यासांच्या दर्शनासाठीं त्यांच्या आश्रमास जात आहों. आमचें परत येणें झालें तरी उत्तम, न झालें तरी उत्तम. सर्वांना स्वस्ति सन्मंगलप्राप्ति होवो, " असें एका पत्रावर लिहून आपला उद्देश शिष्यमंडळीस कळविला. आधुनिक लोक दुर्घट प्रवासास जाणें असेल तेव्हां आपल्या घटपटादि मालमत्तेच्या स्वेच्छेनुसार विनियोगासाठीं मृत्युपत्र करून ठेवून जात असतात. श्रीमदानंदतीर्थ मुनिवरांना ऐहिक अशी कोणतीच इच्छा नव्हती. " स एनान्ब्रह्म गमयति " याप्रमाणें सर्व सज्जनांना श्रीहरिचरणांसन्निध पोहोंचविण्याचा ह्या समीरप्रभूचा अधिकार असल्याकारणानें सर्व सज्जनांचें कल्याण व्हावें हाच ह्यांचा हृद्य विषय होता म्हणून त्यांना स्वस्ति सन्मंगलाची प्राप्ति होवो असें वियोगवाक्य लिहून ठेवून ते श्रीमद्बादरायणाच्या आश्रमास गेले.

आचार्यांच्या शिष्यमंडळांत परम भक्तिमान् सत्यतीर्थ नांवाचे एक शिष्य होते. हे आचार्यांस सोडून कधीं रहात नसत. ऐतरेय उपनिषदाचा अर्थ श्रीमदाचार्यांच्या मुखानें त्यांनीं तीन वेळां श्रवण केला होता. आचार्य एकटेच बादरायणाश्रमाकडे निघालेले पाहून हेही त्यांच्या मागोमाग निघाले. मोठ्या प्रयासानें सत्यतीर्थ त्यांच्या मागोमाग सायंकालपर्यंत चालले; परंतु ते मारुतीप्रमाणें एका पर्वतावरून दुसऱ्या पर्वतावर उड्या मारीत चालले तेव्हां सत्यतीर्थांना त्यांजबरोबर जाणें अशक्य झालें. श्रीमदाचार्यांनीं मागें वळून पाहून परत जाण्याविषयीं सत्यतीर्थांना हातांनीं खुणविलें. त्या हाताच्या हलण्यानें वाऱ्यामध्यें उत्पन्न झालेल्या आंदोलनाच्या योगानें सत्यतीर्थ बदरिकाश्रमांत एका निमिषार्धांत परत येऊन दाखल झाले! घडलेला परम अद्भुत वृत्तांत त्यांनीं आपल्या गुरुबंधूस सांगितला, तो ऐकून सर्वांना अत्यंत आश्चर्य वाटलें. सत्यतीर्थ जोंपर्यंत आचार्यांच्या मागोमाग चालत होते तोंपर्यंत त्यांना एकाद्या पाशबद्धाप्रमाणें होऊन त्वरेनें जातां आलें नाहीं. तेच हे मागें परततांच आचार्य एकाग्र चित्तानें श्रीमद्बादरायणमूर्तीचें ध्यान करीत पुलकोद्रिक्त होऊन अप्रतिरुद्धपणें अतित्वरेनें निघाले. कांहीं वेळ चालून गेल्यावर त्यांना एक अत्यन्त सुंदर वन दिसलें. तें अतिमनोहर वृक्षलतादिकांनीं निबिड असून पक्ष्यांच्या विविध प्रकारच्या मंगलध्वनीनें युक्त आणि ऋषिजनांच्या पुण्याश्रमानें परिवेष्टित होतें. येथेंच मुनिजनांच्या मध्यभागीं श्रीमद्बादरायणांची तेजःपुंज मूर्ति एका उच्च आसनावर आरूढ होऊन बसली होती. श्रीमदाचार्यांनीं त्यांस साष्टांग नमस्कार करून आपादमौलि मंगलमय

व्यासमूर्तीचें पूजनपूर्वक स्तवन करण्यास प्रारंभ केला. त्यांचा कंठ दाटून आला; नेत्रांतून आनंदाश्रूंचा पूर वाहूं लागला. ह्या आनंदाचें खरें स्वरूप आचार्यांसारखे भक्तशिरोमणिच जाणतात. इतरांना त्याची कल्पनाही करतां येणार नाहीं. ह्या आनंदाचें वर्णन उपमानांतरानें करतां येणें सर्वथैव अशक्य होय. श्रीवेदव्यासांनीं ह्या भक्तश्रेष्ठाला प्रेमानें आलिंगून त्याचा योग्य तो अतिथिसत्कार केला. असे अनुगृहीत झाल्यावर आचार्य ह्या दिव्याश्रमांत श्रीव्याससन्निधानीं कांहीं कालपर्यंत राहिले. त्यांनीं आचार्यांना तत्त्वोपदेश केला. दररोज श्रीकृष्णद्वैपायनांच्या मत्स्यकूर्मादि अवतारांचें स्तोत्र आचार्य गात असत. ह्या आश्रमांत आचार्यांनीं श्रीव्यासांच्या सहवासांत वैकुंठामोदाचा अनुभव घेतला. नंतर कांहीं कालानें ते परत नारायणाश्रमांत येऊन भगवत्पूजादिकांत कालक्षेप करूं लागले. येथें पुनः बादरायणांनीं त्यांना दर्शन दिलें. व्यास आणि नारायण ह्या उभय मूर्तींनीं ब्रह्मसूत्राच्या वास्तविक अर्थाचा बोध करणारें भाष्य करून सज्जनांचा उद्धार करण्याविषयीं आचार्यांस आज्ञा केली. ती त्यांनीं शिरसा मान्य केली हें सांगणें नकोच.

नंतर हिमालयांतून त्वरेनें निघून भगवदाज्ञेप्रमाणें सज्जनोद्धारार्थ श्रीमदाचार्यमहोदयांनीं ब्रह्मसूत्रांचें भाष्य केलें. आचार्यांचा शिष्यसमूह उत्तरोत्तर वाढत चालला. एके ठिकाणीं अग्निशर्मप्रभृति पांचसहा शिष्यांनीं, त्यांना एकाच वेळीं भिक्षेचा स्वीकार करून, आपणांवर अनुग्रह करावा अशी प्रार्थना केली. ह्या प्रार्थनेचा तिरस्कार करणें उचित न वाटल्यामुळें त्यांनीं पांचसहा दिवसांचें भोजन

एकदाच करून त्या शिष्यांचें मनोरथ पूर्ण केले. " सर्वेषामपि भक्तानामनुलंघ्यं क्षणं स्मरन् । गमने त्वरितो मध्वः सर्वेभ्योऽपि क्षणं ददौ ॥ " असें पंडिताचार्यांनीं म्हटलें आहे. श्रीमदाचार्यांनीं केलेल्या भाष्याच्या योगानें खालीं नमूद केलेल्या एकवीस वेदविरुद्ध भाष्यांचें खंडन झालें. तीं भाष्यें हीं:—१ भारतीविजय, २ सच्चिदानन्द, ३ ब्रह्मघोष, ४ शतानंद, ५ उद्वर्त, ६ विजय, ७ रुद्रभट्ट, ८ वामन, ९ यादवप्रकाश, १० रामानुज, ११ भर्तृप्रपंच, १२ द्रविड, १३ ब्रह्मदत्त, १४ भास्कर, १५ पिशाच, १६ वृत्तिकार, १७ विजयभट्ट, १८ विष्णुक्रान्त, १९ वादीन्द्र, २० माधवदास, आणि २१ शंकर. इतक्यांनीं केलेलीं भाष्यें एका आचार्यांच्या भाष्यानें पूर्णपणें निरस्त झालीं. हें भाष्य सत्यतीर्थांनीं लिहिलें. श्रीमदाचार्यांचें भाष्य लिहिलें असतां एकेका अक्षराला गंगातीरीं देवालयाची स्थापना केल्याचें महाफल लेखकास प्राप्त होतें असें सांगतात. भगवत्सन्निधानांत वास्तव्य करून विशेष अनुगृहीत झालेला व हिमालयांत उद्भवून खालीं उतरलेला श्रीमन्मध्वरूपी सूर्य आपल्या विलक्षण तेजानें शोभायमान दिसूं लागला. ह्या जगन्मोहनावयवसौंदर्ययुक्त प्रभूच्या वदनरूपी कमलावर सज्जन भ्रमराप्रमाणें मोहित झाले. आचार्यांच्या मुखांतून निघालेल्या भाष्योपदेशरूप गंगाप्रवाहांत निमज्जन करून अपूर्व आनंदानें सकल सज्जन कृतार्थ झाले. उत्तर देशीं सद्वैष्णवमत अत्यंत लोकप्रिय झालें. नवद्वीप वगैरे उत्तर देशांतल्या ठिकाणीं श्रीमदाचार्यांनीं केलेला संचार, त्यांच्यानंतर दोनशें वर्षांनीं श्रीकृष्णचैतन्य उर्फ गौरांगप्रभूकडून प्रचालित झालेल्या भक्तिमार्गाला कारणीभूत झाला. उत्तर देशीं व

बंगाल वगैरे प्रांतीं द्वैतसिद्धान्ताचा पुष्कळच प्रचार झालेला आहे. हें मत त्या प्रांतीं श्रीकृष्णचैतन्यांनीं प्रोत्साहित केलेलें असून तें श्रीमन्मध्वाचार्यांचें द्वैतमतच आहे असें स्वामी विवेकानंदांनीं म्हटलें आहे.

स्वदेशीं परत येतांना श्रीमदाचार्यांनीं आढियाजगन्नाथ वगैरे प्रांतांत संचार करून विलक्षण कीर्ति संपादन केली. तिकडून गोदातीरीं आल्यावर पंडितांच्या मोठमोठ्या सभांतून वाद करून सत्यज्ञानप्रकाश केला. वेदांच्या अठराही शाखांत परम निपुण असून परीक्षा देऊन विद्वत्सन्मान संपादन करण्यासाठीं आलेले मोठमोठे दिग्गजपंडित आचार्यांकडे येत व वादविवाद करीत असत. भाट्ट, प्राभाकर, वैशेषिक, नैयायिक, बौद्ध आणि चार्वाक ह्या मतांचे आचार्य पराजित झाले. ह्या काळीं पंडितमंडळामध्यें दोन पंडित अत्यंत प्रसिद्धीस आले होते. ते दोघेही श्रीमदाचार्यांचे शिष्य झाले. त्यांचीं पूर्वाश्रमांतील नांवें शोभनभट्ट आणि शामिशास्त्री अशीं होतीं. हेच पुढें आचार्यांकडून संन्यास घेऊन पद्मनाभ तीर्थ आणि नरहरी तीर्थ या आश्रमनामधेयांनीं धर्मसाम्राज्याचे अधिपति झाले.

शोभनभट्ट हे महापंडित होते. आचार्यांशीं पुष्कळ वादविवाद करून हे हरले. शामिशास्त्री हे राजामात्यपदवी परंपरेनें संपादन केलेल्या घराण्यांतील असून लौकिकवैदिकसाम्राज्यभाग्यसम्पन्न होते. हे पुढें श्रीमदाचार्य चरणीं शरणागत होऊन संन्यस्त झाले. ह्यांचें आश्रमनाम नरहरितीर्थ असें आचार्यांनीं ठेविलें. ह्या उभयतांनीं ब्रह्मसूत्रभाष्याचें सांगोपांग अध्ययन श्रीमदाचार्यांपाशींच करून त्याचें महत्त्व, अर्थगांभीर्य इत्यादि अनेक गुणांची

प्रसिद्धि देशोदेशीं केली. नरहरितीर्थांनीं परमविरक्त होऊन श्रीमदाचार्यांप्रमाणेंच आपला परंपरागत लौकिक, अधिकार व संपत्ति यांचा त्याग केला. ह्यांचा महिमा स्तोत्रमहोदधीमध्यें विशेष वर्णिलेला आहे. ह्यांना आचार्यांनीं गजपति नगरास जाऊन येण्याविषयीं आज्ञा केली. जाण्याचा उद्देश विचारितां आचार्यांनीं सांगितलें कीं तेथील राजाजवळ मूल रामसीता यांच्या प्रतिमा आहेत. तुम्ही तेथें राजप्रतिनिधि होऊन राज्यसूत्रें कांहीं कालपर्यंत चालवून त्या घेऊन या. त्याप्रमाणें नरहरितीर्थ तिकडे गेले आणि राज्यकारभार करूं लागले. राजप्रातिनिधि असतांना त्यांनीं धर्मस्थापनेचीं अनेक मोठमोठीं कार्यें केलीं असें कळून येतें. ह्यांनींच श्रीकूर्म येथें योगानन्दनृसिंह देवालयाची प्रतिष्ठापना केली. कलिंग नगरचा राजा वयांत आल्यावर त्याचा राज्यकारभार त्याजवर सोंपवून नरहरितीर्थ परत येतांना राजाच्या आज्ञेवरून मूल रामसिता यांच्या प्रतिमा घेऊन आले, आणि त्या श्रीमदाचार्यांस त्यांनीं दिल्या. श्रीमठांत मुख्य पूजनीय प्रतिमा ह्याच आहेत. गंजम जिल्ह्यांत व विशाखपट्टण, सिंहाचल वगैरे ठिकाणीं असलेल्या शिलालेखांवरून ह्यांची कीर्ति सर्वत्र प्रसिद्ध असल्याचें दिसून येतें. खालीं लिहिलेले नऊ श्लोक श्रीकूर्म येथील योगानन्दनृसिंह—देवालयांतील शिलास्तंभावर कोरलेले असून आजमितीसही त्यांच्या सत्कीर्तीची साक्ष देण्यास सिद्ध आहेत.

॥ " देवश्रीकमलाविलासलहरीपात्रं कलिप्रोन्मिलत्- ।
॥ क्लेशाक्लिष्टजनेऽखिलक्षितितले संलीनबोधोदये ॥
॥ स्वीयश्रीपदपंकजैकशरणान्संरक्षितुं सन्मुनि-।

॥ जातः श्रीपुरुषोत्तमाभिधमहातीर्थस्सुमत्यग्रणीः ॥ १ ॥
॥ यन्मुनिभाषितभाष्यं भूष्यं किल तीर्थिकप्रवरसंघैः ।
॥ उन्मादवादिद्विरदप्रतिकुंभमंकुशं भवति ॥ २ ॥
॥ तस्य ज्ञानकलाकलोदयकलो वैयासिकं गोगणं ।
॥ मन्दैर्भिन्नपथप्रतारितमलं सुव्यक्तभेदे पथि ॥
॥ नेतुं संधृतदंडमंडितकरो यः प्रादुरासीन्मुनि- ।
॥ व्रातैस्सेव्यपदारविंदयुगलश्चानंदतीर्थो मुनिः ॥ ३ ॥
॥ यन्मुखनिस्सृतभाषा ललिता ललितप्रकारपदविन्यासा ।
॥ कमलापतिकमलं भजते भजमानभवभयारातिम् ॥ ४ ॥
॥ आनंदतीर्थभगवत्पादाचार्यसरस्वती ।
॥ लोकेऽत्र हरिपादाब्जयुगलप्राप्तये नु( ज्ञ ) सा ॥ ५ ॥
॥ तस्माल्लोकसुरक्षणातिनिपुणात्संप्राप्तकर्तव्यधी— ।
॥ र्द्वेधामुत्र तथात्र योऽवति जनान्कालिंगभूसंभवान् ॥
॥ पित्र्याचारमुपैति सूनुरिति सन्नीतिस्थितौ धर्मत— ।
॥ श्शत्रुक्ष्मापतिवर्गदुर्गनिवहान्भीतानभीतः स्वयम् ॥ ६ ॥
॥ यश्च श्रीकमठादिनायकमहाकार्यैकबद्धव्रत— ।
॥ स्तस्य प्रच्युतिवारणाय शबरानीकक्षितीध्राशनिम् ॥
॥ धत्ते सत्करवालमस्य तटिता (?) संत्यक्तजीवे रिपौ ।
॥ हन्तव्यानवशेषणान्निजाविधिर्नो यस्य बोध्यस्तराम् (?) ॥ ७ ॥
॥ तेनानेन श्रीमन्नरहरितीर्थाख्यमुनिवरेण्येन ।
॥ कलिसमयप्रल्हादप्रभावपरितोष्यनृहरिरूपेण ॥ ८ ॥
॥ स्वस्तिश्रीशकवत्सरे हुतवहव्योमद्वयक्ष्मायुते ।
॥ मेषे शुक्लशशांकशेखरदिने वारे च सौम्ये वरे ॥

॥ प्रासादं कमठाधिपस्य पुरतो निर्माय शर्मप्रदो ।

॥ योगानंदनृसिंह एष भगवान् प्रीत्या प्रतिष्ठापितः ॥ ९ ॥"

यांतील नवव्या श्लोकावरून हा शिलालेख शालिवाहन शक १२०३ या वर्षांतला आहे असें कळून येतें. शके ११८६ पासून १२१५ पर्यंतचे शिलालेख नरहरितीर्थांच्या प्रभावाची साक्ष देत आहेत. मूल रामसीता यांच्या प्रतिमांची कथा अध्यात्मरामायणांत अकराव्या अध्यायापासून पंधराव्या अध्यायापर्यंत सविस्तर सांगितली आहे. इक्ष्वाकुराजाच्या वेळेपासून श्रीरामाची प्रतिमा राजगृहांत कुलदैवत म्हणून पूजिली जात होती. सीतादेवीच्या प्रार्थनेवरून श्रीरामांनीं पूजेकरितां ती तिला दिली. नंतर ह्या प्रतिमा लक्ष्मणास मिळाल्या. अयोध्या नगरांत एक ब्राह्मण रहात असे. श्रीरामाचें दर्शन झाल्यावांचून तो भोजन करीत नसे. एकदां श्रीरामचंद्रांचें आठ दिवसपर्यंत सभेस येणें झालें नाहीं. अर्थातच त्या ब्राह्मणास त्यांचें दर्शन घडलें नाहीं. म्हणून तो आठ दिवसपर्यंत उपोषितच राहिला. नवव्या दिवशीं श्रीरामचंद्र राजसभेस आले. तेव्हां त्या अत्यंत श्रांत झालेल्या ब्राह्मणानें त्यांना साष्टांग वंदन केलें. ब्राह्मणास दयाघन रामचंद्रांनीं म्लानवदन होण्याचें कारण विचारल्यावर त्यानें दर्शन न झाल्यामुळें आठ दिवसपर्यंत अन्नोदक ग्रहण केलें नाहीं असें सांगितलें. तेव्हां लक्ष्मणाच्या येथील त्या प्रतिमा त्या वृद्ध ब्राह्मणास श्रीरामचंद्रांनीं देवविल्या. ब्राह्मणानें आपला जीवमान असेपर्यंत त्यांची पूजा करून अंतकाळीं हनुमंतास दिल्या. भीमसेनावताराच्या वेळीं सौगंधिक पुष्प आणण्यास भीमसेन गेले असतां हनुमंतांनीं त्या प्रतिमा त्यांस दिल्या. पांड-

यांच्या वंशांत क्षेमकांत राजाच्या वेळेपर्यंत त्या प्रतिमा राजगृहांतील पूजेंत होत्या. नंतर त्या गजपतिराजाकडे आल्या. त्या नरहरितीर्थांनीं श्रीमदाचार्यांस आणून दिल्या. यथोक्तं अध्यात्मरामायणेः—

" तस्यां नगर्यां यतिराट् नाम्ना नरहरिः श्रुतः ।
स्वगुरोराज्ञया तत्र प्राप्तुं स्वरघुपस्य सः ॥
ततः सिंहासनारूढं कृत्वा तं तस्य मंत्रिणः ।
स्वराज्यं पालयामासुः निगृह्य द्विषतो बलान् ॥
जाते कुमारे राज्ञस्तु राजपत्न्या यतीश्वरः ।
राज्ये संस्थाप्य तं पुत्रं जगाम स्वमठं पुनः ॥
गच्छंतं तं यतिश्रेष्ठं मंत्रिणः सुपुरोहिताः ।
स्वामिन् कोशगृहे राज्ञो यद्वस्तु मनसेच्छासि ॥
तद् गृहीत्वा प्रगंतव्यं नात्र कार्या विचारणा ।
एवमुक्तो नरहरितीर्थार्यः प्रविचिन्त्य सः ॥
तथाह परमप्रीतः ससीतं रघुनंदनम् ।
सुवस्त्रवेष्टितं रत्नमंजूषायां सुसंस्थितम् ॥
राममालापरिक्षिप्तमुक्ताहारविभूषितम् ।
अम्लानतुलसीगंधमर्चितं सुरसत्तमैः ॥
सीतया सहितं देव्या मौक्तिकादिविभूषया ।
रामचंद्रं स संगृह्य गुरवे चार्पयद्यतिः ॥
गुरुणा पूजितं रामं ततः स्वयमपूजयत् । "

अध्याय १५.

श्रीमदाचार्य रजतपीठपुरास येऊन श्रीअनंतेश्वराची सेवा करूं लागले. स्वकृत सूत्रभाष्याची एक प्रत लिहून ती त्यांनीं अच्युत-

प्रेक्षाचार्यांकडे अगोदरच पाठवून दिली होती. आपला दिव्यतेजः-पुंज शिष्य आनंदतीर्थ सूत्रभाष्याचा कर्ता म्हणून जगद्विख्यात झाला हें पाहून त्यांना फार संतोष वाटला. श्रीमदाचार्यांनीं आपल्या भाष्याचा भावार्थ व्याख्यानें, प्रवचनें इत्यादि द्वारा लोकांस समजावून सांगण्याचा क्रम आरंभिला. अच्युतप्रेक्षाचार्य श्रीमदाचार्यांचे यद्यपि गुरु होते तथापि त्यांचा ओढा पूर्वसंस्कारबलानें मायावादाकडेच होता. त्यामुळें अनेक प्रश्न विचारून विचारून त्यांनीं आपल्या संशयग्रंथि यच्चयावत छेदून टाकिल्या. आणि नंतर आचार्यांचें भाष्य यथार्थ आहे असें मान्य केलें. आचार्यांचीं प्रवचनें श्रवण करण्यास खास उडुपी येथील व आसपासच्या गांवांतील पुष्कळ लोक नित्य येत असत, इतकेंच नाहीं तर शेषादिक देवताही आकाशांत मोठ्या उत्सुकतेनें येत असत.

" विचंद्रायां प्रभायां तु चंद्रिकाश्रयिणो नराः ।
शेषस्य तेजस्यथ तं यानं मध्वो व्यदर्शयत् ॥ "

या प्रमाणवचनावरून एके अंधाऱ्या रात्रीं शेषदेव सनकादिकांसहवर्तमान प्रवचन श्रवण करून परत जात असलेले आचार्यांनीं आपल्या शिष्यांस दाखविलें असें कळून येतें.

एकदां समुद्रतीरीं आचार्य तपोनिष्ठ होऊन बसले असतां एका व्यापाऱ्याची नौका रेतीमध्यें अडकून पडली होती. कांहीं केल्या ती जागची हलेना. तेव्हां तो व्यापारी संकटग्रस्त होऊन तळमळूं लागला. काय करावें हें त्यास सुचेना. ती त्याची अवस्था पाहून करुणानिधि आचार्यांस दया आली आणि त्यांनीं बसल्या जागींच आपल्या हातांतील वस्त्र किंचित् हलविलें. तत्प्रेरित वायूच्या योगानें

ती नाव तीरास लागली. तेव्हां त्या नावेच्या मालकानें अत्यंत नम्रतेनें आचार्यांस साष्टांग प्रणिपात करून कृतज्ञतेनें त्यांना यथेष्ट कनकाभिषेक करण्याची आपली इच्छा दर्शविली. आचार्यांनीं धनाचा तिरस्कार करून फक्त गोपीचंदन देण्यास त्या व्यापाऱ्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्यानें गोपीचंदन आचार्यांस अर्पण केलें. त्यांनीं एक खडा फोडतांच त्यांतून परमसुंदर श्रीकृष्णाची मूर्ति निघाली; ती मध्वसरोवरांत चांगली धुवून पुसून स्वच्छ केली. श्रीमदाचार्यांचा हस्तस्पर्श त्या मूर्तीस होतांच तींतील श्रीकृष्णाचें सान्निध्य विशेषरूपानें व्यक्त झालें. त्या सान्निध्याच्या योगानें ती प्रतिमा इतकी जड झाली कीं, तीस शिष्यांनीं सर्व शक्ति एकवटून उचलली तरी ती जागची हलेना. तेव्हां आचार्यांनींच उचलून नेऊन तिची स्थापना केली. श्रीकृष्णप्रतिमा मिळाल्या दिवशीं श्रीमदाचार्यांनीं द्वादशस्तोत्र नामक ग्रंथाची रचना करून श्रीहरीची स्तुति केली. समुद्रतीरास जात असतां प्रतिमालाभाच्या प्रतीक्षेनें आचार्यांनीं ह्या स्तोत्राचे पाहिले पांच अध्याय आणि प्रतिमा मिळाल्यावर पुढील सात अध्याय रचिले असा इतिहास आहे. आचार्यांचे शिष्य हृषीकेशतीर्थ ह्यांनीं त्यांचे मूलग्रंथ लिहिले. ह्या हस्तलिखित प्रती उडुपी येथील पलमारु मठांत अद्यापि आहेत. ह्या प्रतीवरून पाहतां द्वादशस्तोत्रांतील प्रस्तुत सातवा अध्याय बारावा असल्याचें दिसतें.

श्रीमदानंदतीर्थ भगवत्पादाचार्यांच्या करकमलांनीं प्रतिष्ठापित व पूजित झालेल्या ह्या श्रीकृष्णाच्या मूर्तींत महासान्निध्य आहे म्हणून सर्व सज्जन उडुपीयाला व श्रीकृष्णाचें दर्शन आपणास घडावें

अशी इच्छा करितात. ह्या मूर्तींची पूजाअर्चा आचंद्रार्क होत असावी म्हणून श्रीमदाचार्यांनीं आठ मठांची स्थापना केली आहे. त्याप्रमाणें त्यांच्या वेळेपासून आजतागायत ती चालू आहे. सांप्रत पर्यायपद्धतीच्या क्रमानें दोन वर्षांनीं एकदां एकेक यति श्रीकृष्ण-पूजकाच्या स्थानीं आरूढ होत असतात. तेथील पवित्रपणा, पूजा-अर्चेचा शुद्ध सात्त्विक विधि, मंत्रतंत्रादि विन्यास पाहून आचार्यांच्या योजनेचें व महत्त्वाचें आश्चर्य वाटल्यावांचून रहात नाहीं. श्रीमध्वसांप्रदायाच्या देवमंदिरांत देवदासी, वारांगना, मुरळ्या वगैरे नीतिबाह्य स्त्रियांच्या नाचासारखे अधर्मोत्तेजक प्रकार अगदीं होत नाहींत; तसेंच यज्ञयागादिकांत पशुवध होणें हाही अधर्मच होय असें श्रीमदाचार्यचरणांनीं सप्रमाण स्थापित केलें आहे. यावरून आचार्यांची कर्तबगारी किती सोज्ज्वल व व्यापक स्वरूपाची आहे हें अगदीं स्थूल दृष्टीच्या मनुष्यालाही दिसून येईल.

श्रीकृष्णप्रतिमेची स्थापना झाल्यानंतर कांहीं काळपर्यंत आचार्यांनीं रजतपीठपुरासच राहून आपला प्रवचनाचा क्रम निरंतर चालविला होता. अनंतेश्वराच्या देवालयांतील एक समचतुरस्र प्रदेश आचार्यांची प्रवचनाची जागा म्हणून आजलाही यात्रेकरूंना दाखविण्यांत येतो. ह्या परम पवित्र स्थलीं साक्षात् आचार्यांना बसलेले पाहून त्यांच्या मुखांतून होणाऱ्या शास्त्रार्थरूपी जान्हवीच्या प्रवाहांत मज्जन केलेले सज्जन किती धन्य होत याचें स्मरण होऊन देह पुलकोद्रिक्त होतो ! आचार्यांचे बंधु आतां मोठे होऊन पंडित म्हणून विख्यात झाले होते. त्यांची आचार्यांच्या ठिकाणीं अप्रतिम निष्ठा होती. ज्या पूगवन कुलांतील ब्राह्मणापाशीं आचा-

यांनीं पूर्वाश्रमीं अध्ययन केलें होतें त्यांच्या मुलानें एक याग केला होता. ह्या यागांत आचार्यांचे बंधु अध्वर्यु होते. सत्कर्मानुष्ठानांत व्यत्यय आणण्याचें राक्षसांचें काम अगदीं पुराणप्रसिद्धच आहे. त्याप्रमाणें जराघटित नांवाचा एक प्रबल विरोधी मनुष्य ह्या यज्ञांत मत्सरानें विघ्नें उत्पन्न करूं लागला. त्यामुळें याग प्रतिरुद्ध झाला. पुढें काय करावें हें दीक्षितांना उमजेना. ही गोष्ट आचार्यांस समजतांच गांवच्या शिष्ट लोकांना एकत्र जमवून त्यांनीं योग्य उपायांनीं सर्व विघ्नांचा परिहार केला. त्यामुळें यागाची परिसमाप्ति उत्तम प्रकारें होऊन सर्वांस आनंद झाला. याप्रमाणें अनेक रीतींनीं लोकांवर अनुग्रह करीत लोहचुंबकाप्रमाणें सज्जनांचीं मनें आकर्षित करून आचार्य कांहीं कालपर्यंत रजतपीठपुरासच राहिले, आणि नंतर ते पुनः बदरिकाश्रमास गेले.

---

# भाग ७ वा.



## बदरिकाश्रमाची दुसरी यात्रा.

श्रीमदानंदतीर्थ भगवत्पादाचार्य दुसऱ्या खेपेस बदरिकाश्रमाच्या यात्रेस निघाले; तेव्हां त्यांजबरोबर सत्यतीर्थ—उपेन्द्रतीर्थप्रभृति परम अनुरक्त असलेले यति शिष्यही होते. आचार्यांच्या वेळीं आर्यावर्त देश निरनिराळ्या लहानलहान राज्यांनीं विभागलेला होता. दक्षिण कर्नाटकाच्या उत्तरेस असलेल्या महाराष्ट्रराज्याचें मुख्य राजधानीचें शहर देवगिरी उर्फ दौलताबाद हें होतें. तेथें यादव वंशांतला महादेव नांवाचा एक राजा राज्य करीत होता. ह्याची कारकीर्द शके ११८२ पासून ११९३ पर्यंत होती असें महाराष्ट्राच्या इतिहासावरून कळतें. हा राजा धर्मकार्यांत तत्पर असे. परंतु तीं कार्यें करण्याची याची तऱ्हा मात्र चमत्कारिक व लोकांस त्रासदायक असे. विहिरी, तलाव वगैरे ठिकठिकाणीं खोदून पाण्याचें दुर्भिक्ष दूर करण्याचा आपला स्तुत्य उद्देश, रस्त्यानें येणाऱ्या जाणाऱ्या वाटसरू लोकांना अडवून त्यांजकडून जबरदस्तीनें जलाशय खोदवून सिद्धीस नेत असे. त्याची ही आज्ञा न मानणारास निष्ठुर शासनही तो करीत असे. श्रीमदाचार्य आपल्या शिष्यमंडळासहवर्तमान ह्या महादेवराजाच्या राज्यांतून जात असतां त्यांना पुढें जाण्यास प्रतिबंध करून ह्यानें आधिपत्यमदानें अंध होऊन कुदळी घेऊन जमीन खणावयास सांगितलें. तेव्हां आचार्यांनीं, आपण कधीं हें काम केलेलें नाहीं व तें कसें करावें हेंही आपणास माहीत नाहीं; परंतु

राजेसाहेब जमीन कशी खणतात हें स्वतः खणून दाखविल्यास आपण त्यांचें अनुकरण करूं, असें महादेवराजास सांगितलें. अंतर्नियामक प्राणदेवाची प्रेरणा झाल्यावर तिचें उल्लंघन कोण करूं शकणार ? आचार्यांचें वाक्य ऐकून तो राजा मंत्रस्तब्ध झाल्याप्रमाणें, आपला राजेपणा विसरून एकाद्या साधारण मजूराप्रमाणें कुदळ घेऊन जमीन खणूं लागला. विश्रांति न घेतां सायंकालपर्यंत त्यानें काम केलें. आचार्यांस प्रतिबंध करण्याचें तो विसरूनच गेला. हा प्रकार पाहून मंदस्मित करून ते सशिष्य पुढें निघून गेले.

भागीरथीच्या पैल तीरावर तुर्क ( तुरुष्क ) राजाचें एक राज्य होतें. दक्षिणेकडून नदी ओलांडून त्या राज्यांत पाय ठेवणें घोर शासनामुळें कोणालाच शक्य नव्हतें. गुप्तपणें इतर राजांचे हेर येऊन राज्याला अपाय करितील या भीतीनें राजेलोकांनीं परस्पर वैरमूर्च्छित होऊन भागीरथींत नावांचें जाणें येणें अगदीं बंद केलें होतें. अशा स्थितींत आपल्या शिष्यपरिवारासहवर्तमान आचार्य भागीरथीच्या तीरावर येऊन पोहोंचले. नाव नसल्यामुळें नदी ओलांडून जाणें अगदीं अशक्य होतें. शिष्यमंडळी घाबरली. त्यांच्याच्यानें पुढें पाय ठेववेना. तेव्हां श्रीमदाचार्यांनीं नदींत जाऊन एका शिष्याचा हात धरिला आणि त्या शिष्याचा हात दुसऱ्या शिष्यानें, दुसऱ्याचा तिसऱ्यानें, तिसऱ्याचा चौथ्यानें अशा क्रमानें एकमेकांचे हात धरावे असें सांगितलें. ह्याप्रमाणें हात धरून पाण्यांत सर्वजण येतांच त्यांनीं सर्वांना डोळे झांका म्हणून सांगितलें. शिष्यांनीं डोळे झांकतांच आपल्या अघटितघटनाशक्तीनें आचार्यांनीं सर्वांना परतीरावर आणून सोडिलें.

ह्या गोष्टींतील रहस्याकडे वाचकांनीं लक्ष पुरवावें. आचार्यांची आज्ञा होतांच, आपणांस अपाय होईल अशी लेशमात्रही भीति न बाळगतां भागीरथीच्या अगाध जलांत शिष्यांनीं आनंदानें प्रवेश केला. यावरून गुरूची आज्ञा प्राणापेक्षांही श्रेष्ठ व प्रिय आहे हें त्यांनीं आपल्या आचरणानें जगाच्या निदर्शनास आणिलें. आचार्यांना अनुसरलें तर सर्व भयाचा परिहार होईल, उपद्रव म्हणून कसलाही होणार नाहीं हा त्यांचा दृढनिश्चय होता हें ह्या गोष्टीवरून उघड दिसून येतें. गुरुभक्तियुक्त चित्तानें अगाध जलप्रवाहांत निःशंकपणें प्रवेश करण्यास सिद्ध होणारे शिष्यच उद्धाराला पात्र होत. भवप्रवाहांत बुडालेल्या जीवसंघाला हातीं धरून घेऊन जाऊन परतीररूपी परब्रह्मासन्निध आम्ही पोहोंचवितों असा ध्वन्यर्थ ह्या भागीरथीसंतरणाच्या आख्यानावरून श्रीमदाचार्यचरणांनीं जाहीर केला.

आपल्या हद्दींत हे परकी लोक आलेले पहातांच तुर्क राजाच्या नगरसंरक्षक सैनिकांनीं हाणा, मारा, ठोका, असा आक्रोश करीत पुढें जाण्यास सशिष्य श्रीमदाचार्यांस मज्जाव केला. परंतु श्रीमदाचार्यांनीं योग्य शब्दांनीं त्यांचा कोप शांत करून सांगितलें कीं, बाबांनो, तुम्ही कांहीं घाबरूं नका; आम्ही तुमच्या राजाकडेच जात आहों, भिऊं नका. असें सांगून ते त्या तुर्क राजाकडे गेले. नाव वगैरे साधनें नसतां आपण भागीरथी ओलांडून कसे आला, दक्षिणेकडून येणारे लोक हेर आहेत असें समजून कांहींएक विचारपूस न करितां त्यांना देहान्तशिक्षा द्यावी असा माझा नगररक्षकांना अनुल्लंघनीय हुकूम असतां त्यांच्या दृष्टींतून निसटून आपण येथपर्यंत सुखरूप कसे आला ? असें त्या राजानें श्रीमदाचार्यांस विचारलें; तेव्हां

त्यांनीं सर्व वृत्तान्त त्याच्या भाषेंत त्या राजास सांगितला. बत्तीस लक्षणांनीं युक्त, कनकद्युतिशोभामंडित अशा श्रीमन्मध्वमूर्तीस पाहतांच तो तुरुष्क राजा फारच संतुष्ट झाला. आचार्यांविषयीं त्याच्या अंतःकरणांत आदर आणि विश्वासबुद्धि उत्पन्न झाली. असलें जगद्विलक्षण सौंदर्य या पूर्वीं त्यानें कधीं पाहिलेलें नव्हतें व त्याविषयीं ऐकलेलेंही नव्हतें. तें अनपेक्षितपणें एकाएकीं दृष्टिगोचर झाल्यामुळें त्याच्या आनंदास पारावार नाहींसा झाला. आचार्यांचें गंभीर भाषण किंकिणीच्या ध्वनीप्रमाणें त्याला परम आल्हादकारक वाटलें. तुर्क भाषा त्यांच्या मुखसंगमानें पवित्र झाली. राजा त्यांचा मोठा भक्त झाला. आपलें अर्धें राज्य देखील श्रीमदाचार्यांच्या चरणीं अर्पण करण्यास तो सिद्ध झाला. परंतु ते धनादिकाविषयीं अगदींच निःस्पृह असल्यामुळें त्यांनीं स्वीकारिलें नाहीं. तुर्क राजानें केलेल्या फलपुष्पसत्काराचा स्वीकार करून श्रीमदाचार्य पुढें जाण्यास निघाले.

आचार्य प्रवासांत असतां कित्येक वेळां चोरांनीं त्यांना लुटण्याचा यत्न केला असेंही त्यांच्या चरित्रावरून कळून येतें. द्रव्याचा अपहार करण्याच्या दुर्बुद्धीनें आचार्य ज्या मार्गानें चालले होते त्याच मार्गावर ते आले. तेव्हां त्यांनीं आपल्या करवस्त्राचें एक गाठोडें करून त्या चोरांसमोर ठेविलें. तें त्या चोरांना द्रव्याचें गाठोडें आहे असें वाटून प्रत्येकजण आपणास मिळावें म्हणून आपापसांतच ते भांडूं लागले. तें भांडण इतक्या थरास जाऊन पोहोंचलें कीं, अप्पलपोटेपणानें हाणामारी करून ते सर्व प्राणास मुकले.

दुसऱ्या एका ठिकाणीं शंभर दरवडेखोर पुढें आले असतां श्रीमदाचार्यांनीं उपेंद्रतीर्थ नामक आपल्या शिष्याकरवीं त्यांची

दाणादाण करून सोडली. उपेंद्रतीर्थांच्या अंगांत विचित्र शक्तीची प्रेरणा करून त्यांजकडून चोरांशीं त्यांनीं सामना करविला. उपेन्द्र तीर्थांनीं तरवार कधीं पाहिली देखील नव्हती, मग ती कशी धरावी हें त्यांस माहीत कोठून असणार ? तथापि प्रेरितशक्तीच्या प्रभावानें त्या दरवडेखोरांच्याच हातांतील तरवार हिसकावून घेऊन एकाद्या महायोद्ध्याप्रमाणें उपेन्द्रतीर्थांनीं त्यांजवर भयंकर प्रहार केले. ते त्यांना असह्य होऊन सर्व दरवडेखोर वाट फुटेल तिकडे पळत सुटले.

आपल्या शिष्यवर्गासमागमें आचार्य चालले असतां आणखी कांहीं चोरांशीं त्यांची गांठ पडली. या वेळीं त्या चोरांना ही आचार्यादि मंडळी माणसाप्रमाणें न दिसतां दगडांच्या राशीप्रमाणें दिसली. पण दुसऱ्याच क्षणीं तो पाषाणसमूह चालत असलेला त्यांनीं पाहिला. तेव्हां आश्चर्यचकित होऊन ते चोर आचार्यांस शरण आले आणि कृतापराधाची क्षमा मागून आल्या वाटेनें चालते झाले.

श्रीमदाचार्यांच्या शिष्यांपैकीं सत्यतीर्थ हे त्यांजबरोबर देवाची संबळी व पूजासंभार वगैरे घेऊन चालले असतां एक राक्षस वाघाच्या घोर रूपानें उड्या मारीत आला. सोललेल्या केळाप्रमाणें त्यांना गिळून टाकण्यास तो उद्युक्त झाला असतां श्रीमदाचार्यांनीं आपल्या नुसत्या करस्पर्शानें यमलोकीं त्याची रवानगी करून दिली.

ह्या व आणखी अनेक गोष्टींवरून श्रीमदाचार्य विचित्र प्रभाव-सम्पन्न होते ही गोष्ट अगदीं उघड दिसून येते. सर्वांच्या अंतः-प्रेरक प्रभूला राज-चोर-महाव्याघ्रांकडून होणाऱ्या पीडांचें निवारण करितां येणें हें कांहीं आश्चर्यकारक नव्हे; परंतु, त्यांचा हा विलक्षण महिमा देशदेशांतरीं प्रसृत होऊन लोकांचा त्यांजवर अधिकाधिक

विश्वास बसण्यास कारणीभूत झाला. महात्मे अद्भुत कृत्यें स्वार्थासाठीं करीत नसतात. आणि दंभार्थ तर ते सुतरां करीत नसतात; तर शिष्यांच्या हितासाठीं—लोककल्याणासाठीं—च तीं ते करीत असतात. स्वमाहात्म्यज्ञापनेनें सज्जनांचा उद्धार व्हावा हाच काय तो त्यांचा उद्देश असतो.

तुर्क ( तुरुष्क ) राज्यांतून कोणत्याही प्रकारें त्रास न पावतां उलट बहुमानपुरःसर निघून श्रीमदाचार्य कृष्णद्वैपायनांच्या आश्रमांत आले व त्यांच्या मंगलचरणकमलांची आराधना करूं लागले. मार्गांत सहस्रावधि विघ्नें येत होतीं, तथापि बादरायणाच्या ठिकाणीं आचार्यांचें अप्रतिबद्ध प्रेम असल्याकारणानें त्यांनीं त्या सर्व विघ्नांचा परिहार अगदीं निरायासानें केला. गेल्या खेपेस श्रीमद्व्यासदर्शन घेऊन परत निघाल्यापासून पुनः परत येईपर्यंतची सर्व कच्ची हकीकत त्यांनीं श्रीमद्बादरायणचरणीं निवेदन केली. भगवंतांच्या आज्ञेप्रमाणें ब्रह्मसूत्रभाष्यादिक ग्रंथ तयार करून दुर्वादिजनांच्या निग्रहानें सद्वैष्णवमताचा प्रचार आणि शोभनभट्ट, शामिशास्त्रीप्रभृति पंडितजनांचा केलेला उद्धार इत्यादि कृत्यें अपरोक्षतः त्यांच्या चरणकमलीं आचार्यांनीं अर्पण केलीं. ह्या भक्तराजाच्या सेवेनें बहुत संतुष्ट होऊन श्रीमद्वेदव्यासांनीं त्यांजवर विशेष अनुग्रह केला.

बादरायणांनीं आपल्याजवळ असलेल्या आठ शालग्रामशिला आचार्यांस मोठ्या प्रेमानें दिल्या. त्या त्यांनीं उडुपी, सुब्रह्मण्य आणि मध्यताल या तीन ठिकाणीं व आपल्या मठांतही ठेविल्या. ज्या स्थलीं शालग्रामशिला असतात तीं स्थलें भगवत्सान्निध्यानें परम

उत्कृष्ट व भाग्यसंपन्न असतात. व्यासांचें दर्शन आणि शालग्रामलाभ ह्यांचा उल्लेख वायुपुराणांतही आहे. तो असा:—

" दिष्ट्या व्यासाश्रमं गच्छन्मुख्यप्रेष्यो यतो मरुत् ।
प्रणिपत्य महान् मध्वो व्यासं निजगुरुं परम् ॥
विज्ञापयामास भूमौ स्वव्याप्तिसुदुष्करम् ।
निशम्य तस्य वाक्यानि व्यासस्सर्वान्तरात्मकः ॥
स्वाधिष्ठान्पंच वाष्टौ ग्रावाणः कृपया ददौ । "

बादरायणप्रणीत ग्रंथांमध्यें ब्रह्मसूत्रांप्रमाणेंच श्रीमन्महाभारत हा उत्कृष्ट ग्रंथ आहे. हा गूढार्थोपबृंहित व तत्त्वोपदेशकथाभरित आहे. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त करून देणाऱ्या उपायामृताचा वर्षाव करणारा ग्रंथराज हा असल्यामुळें " भुक्तिविमुक्ती भारततः " असें सांगितलें आहे. भारत हा ग्रंथ अति विस्तृत, प्रमेयभूयिष्ठ आणि भारवान् असल्याकारणानें मुमुक्षु जनांना संक्षेपानें तत्त्वार्थ समजावून सांगण्याकरितां " **श्रीमन्महाभारततात्पर्यनिर्णय** " नांवाचा ग्रंथ करा अशी श्रीवेदव्यासांनीं आचार्यांस आज्ञा केली. ती शिरसा वंदनपूर्वक मान्य करून ते हिमाचलावरून खालीं आले.

परत येतांना मार्गांत पुनः भागिरथी नदीचें उल्लंघन करून आचार्य श्रीक्षेत्र काशीस आले. तेथून हस्तिनावती, कुरुक्षेत्र, इषुपतक्षेत्र, गोवा वगैरे देशांत आचार्यांनीं संचार केला. भागीरथीच्या तीरास आल्यावर पुनः त्यांना ती अद्भुत रीतीनेंच ओलांडावी लागली. राजांच्या परस्पर वैरामुळें नदीतीर ओसाड झालें होतें. एकही नाव नसल्यामुळें लोकांचें येणें जाणें अगदीं बंद पडलें होतें.

श्रीमदाचार्यांचा पुरोगामी शिष्यवृंद विषादयुक्त चित्तानें त्यांच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करीत नदीतीरीं बसला होता. आचार्य त्या स्थळीं येतांच नदी ओलांडून जाणें अशक्य आहे असें त्या शिष्यांनीं त्यांस कळविलें. तें ऐकून श्रीमन्मध्वाचार्य तत्क्षणीं अंतर्धान पावले.

आपले गुरु एकाएकीं दिसेनातसे झालेले पाहून सर्व शिष्यवृंद परम दीन व भग्नाश होऊन बसला. पुढें काय करावें हें त्यांस सुचेना. शिष्यांना न दिसतां नदीच्या प्रवाहांत जाऊन जलस्तंभविद्येनें श्रीमदाचार्य पैलतीरावर गेले. त्यांचीं वस्त्रें मुळींसुद्धां भिजलीं नाहींत. हा प्रकार अवलोकन करून तेथील लोकांना मोठा अचंबा वाटला. हे अलौकिक पुरुष आजानुबाहु, सुंदरांग, उत्तम पुरुषकलासंपूर्ण असे यति आहेत, त्यांच्या नेत्रयुगलांतून कृपेचा प्रवाहच जणों चालला आहे, ललाटभागीं प्रज्ञा जणों तांडवनृत्यच करीत आहे असें तेथील लोकांना दिसलें. त्यांचें मंगलांग पिकलेल्या लिंबाप्रमाणें मनोहर असून त्यांच्या देहकांतीनें काषायवस्त्रें विद्युल्लतेप्रमाणें विशेष शोभायमान दिसत होतीं. सारांश, ती सर्वोत्कृष्ट मूर्ति पाहिल्याबरोबर पैलतीरस्थ लोकांना हे महात्मे आहेत असें निश्चितपणें वाटून त्यांनीं त्यांचा स्वागतसमारंभ मोठ्या प्रेमानें आणि उत्साहानें केला. आबालवृद्ध सर्व लोकांनीं त्यांना भक्तियुक्त अंतःकरणानें अभिवंदन केलें. श्रीमदाचार्यांचें महामाहात्म्य पाहून भागीरथीनें, श्रीकृष्णाला यमुनेनें वाट दिल्याप्रमाणें, यांना वाट दिली असें सर्वांस वाटून तो वृत्तान्त त्यांनीं आपल्या राजास तत्काळ कळविला. तो आपल्या परिवारासह लागलीच आचार्य-

दर्शनार्थ आला. राजानें व लोकांनीं केलेल्या सत्काराचा स्वीकार केल्यानंतर आपली शिष्यमंडळी पैलतीरीं बसल्याची हकीकत आचार्यांनीं त्यांस सांगितली; तेव्हां नदींत नावा घालून त्या शिष्य-जनांना घेऊन येण्याविषयीं त्या राजानें लागलीच आपल्या सेवकांना आज्ञा केली. त्याप्रमाणें अल्पावकाशांतच सर्व शिष्यमंडळी गुरुचरणसान्निधानीं येऊन दाखल झाली. सर्वांनीं तेथील स्वागतोपचारांचा स्वीकार करून पुढें प्रयाण केलें.

चातुर्मास्य जवळ आल्यामुळें श्रीमन्मध्वाचार्य हस्तिनावतींत जाऊन जवळच असलेल्या एका मठांत राहिले. समुचित—नियम-दीक्षित झाल्यानंतर एके दिवशीं श्रीगंगादेवीनें प्रत्यक्ष येऊन श्रीमदाचार्यांनीं आपणांवर अनुग्रह करावा अशी प्रार्थना केली असें सांगतात. चार महिने झाल्यानंतर श्रीक्षेत्र काशीस त्यांची स्वारी शिष्यजनांसहवर्तमान आली. या क्षेत्रांत सरस्वती, भारती, पुरी इत्यादि अनेक बिरुदवलिधारी परकीय यतिजन रहात होते. त्या यतिजनांत एक इंद्रपुरी नांवाचा संन्यासी मोठा प्रबल म्हणून प्रसिद्ध होता. ज्ञान आणि कर्म ह्यांच्या मोक्षसाधनत्वाविषयीं वाद करण्याच्या उद्देशानें त्या इंद्रपुरी संन्याशानें आचार्यांस वादास आव्हान केलें. ज्ञान मिथ्या, ज्ञानीही मिथ्या म्हणजे मोक्षसाधनें सर्व मिथ्या म्हटलीं तर मोक्षालाही मिथ्यात्व दोष येतो. ह्या मिथ्यावादाशीं ज्ञान आणि सत्कर्मानुष्ठान यांचा मेळ बसत नाहीं. ऐक्य-मतांत परमात्मा आणि जीव यांचा स्वामिभृत्यभाव अथवा सेव्यसेवक-भाव मुळींच साध्य होत नाहीं असें समर्पक उत्तर देऊन आचार्यांनीं इंद्रपुरीचें वाग्जाल सर्व छेदून टाकिलें. काशीक्षेत्र म्हटलें

म्हणजे चौदा विद्या व चौसष्ट कला जेथें अभिवृद्ध होऊन अत्यंत प्राबल्यानें वास करितात असें स्थान होय. येथें व्याकरण, तर्क, वेदान्तादि शास्त्रांतील निःसीम पंडित हजारों विद्यार्थ्यांचे अध्यापक म्हणून पांडित्यमदोन्मत्त होऊन वास करीत होते. हें अद्वैत संन्याशांचें सम्मेलनाचें--समागमाचें--स्थल होय. भिक्षा दिल्यास शेकडों संन्यासी जमा व्हावयाचे. अशा ठिकाणीं कर्ममार्ग आणि ज्ञानमार्ग यांविषयीं वाद होऊन श्रीमदाचार्यांनीं वादिजनांस जिंकिलें. अद्वैत दुर्गपालक जमावाजमावांनीं शस्त्रपाणि होऊन किल्ल्याचें रक्षण करीत असतां द्वैत प्रभु श्रीमदानंदतीर्थभगवत्पादाचार्य यांनीं आपल्या अप्रतिरुद्ध वाग्बाणांनीं सर्व योद्ध्यांना जिंकून परदुर्ग हस्तगत केला, ही गोष्ट इंद्रपुरीवर मिळविलेल्या विजयानें जाहीर होते. काशीक्षेत्रांत असा महामहिमा दाखविल्यामुळें आचार्य हे यतिशिखामणि आहेत असें सर्व लोक मोठ्या आदरानें म्हणूं लागले. हस्तिनावती, कुरुक्षेत्र इत्यादि स्थलांच्या सान्निध्यानें आचार्यांना आपल्या पूर्वचरित्राचें स्मरण होऊन ठिकठिकाणीं संचार करीत असतां प्रसंगवशात् त्यांनीं आपलें भीमसेनांशत्व लोकनिदर्शनास आणून दिलें. हे काशीस असतां एकदां शिष्यमंडळी आपापल्या सामर्थ्याची आपसांत बढाई करीत होती. तो वार्तालाप ह्यांच्या कानीं आला. त्यांच्या गर्वाचा परिहार आचार्यांनीं सहज लीलेनें केला. एकेकानें स्वतंत्रपणें व सर्वांनीं मिळून एकदम आपणाशीं बाहुयुद्ध करावें असें त्यांस आचार्यांनीं सांगितलें. त्याप्रमाणें युद्ध होऊन ते बढाईखोर शिष्य निःसत्व व हीनगर्व झाले. यावरून श्रीमदाचार्य केवल वाग्बुद्धिबलांतच प्रबल होते असें नाहीं, तर

बाहुयुद्धांत देखील त्यांचें प्रावीण्य अपूर्व हें त्यांनीं विशद करून दाखविलें. काशीहून निघाल्यावर भारतीयुद्धाचें रणांगण त्यांच्या दृष्टीस पडलें. त्यावरून त्या युद्धांतील सर्व वृत्तान्ताचें स्मरण आचार्यांना झालें. भीमसेन होऊन आपण युद्ध करीत असतां जी गदा हातांत होती ती आचार्यांनीं शिष्यांना दाखविली. कुरुक्षेत्रांत तपस्व्याचा वेष धारण करून एक मनुष्य कीर्तीच्या उद्देशानें तपोनिष्ठ होऊन योगी म्हणवून घेत होता. हा कपटी तपस्वी भावी मारीच राक्षस आहे असें लोककल्याणार्थ आचार्यांनीं सांगितल्यावरून लोकांनीं त्याची परीक्षा केली. तेव्हां तो विष्णु व वैष्णव ह्यांचा महाद्वेषी आहे असें आढळून आलें.

हृषीकेश देशीं संचार करीत असतां एका शैवानें श्रीमदाचार्यांस अत्यादरपुरःसर भिक्षा दिली. स्वप्नद्वारा ह्याच्या अंतःकरणांत आचार्यांविषयीं मोठी विश्वासबुद्धि उत्पन्न झाली. साक्षात् रुद्रदेवांनींच ह्या शिवभक्ताला, स्वप्नांत दर्शन देऊन, प्रेरणा केली होती. आदल्या दिवशीं एका ब्राह्मणानें आचार्यांकडे येऊन भिक्षा स्वीकारावी म्हणून प्रार्थना केली. ती त्यांनीं मान्य केली. दुसऱ्याच दिवशीं त्या शिवभक्तानें आचार्यचरणीं लीन होऊन भिक्षा दिली आणि मोठ्या संभ्रमानें चांगला उत्सव केला. आदल्या दिवशीं प्रार्थना करावयास आलेला ब्राह्मण साक्षात् रुद्रदेवच होते; त्यांनींच आपल्या भक्ताच्या अंतःकरणांत प्रेरणा करून आपल्या गुरूची—समीरमध्वाचार्यांची—आराधना केली. महासद्वैष्णव संन्याशाविषयीं शैवानें दाखविलेला अनुपम आदर व अपूर्व विश्वास पाहून पंडित-पामरादि सर्व लोक त्यांची भक्ति करूं लागले.

इषुपतक्षेत्र आणि गोवा या प्रांतीं श्रीमदाचार्यांचा महिमा आणखी विशेष रूपानें व्यक्त झाला. विष्णुमंगल येथें त्यांनीं एकाच वेळीं दोनशें केळीं भक्षण केलीं. इषुपतक्षेत्रांत त्यांनीं एका भक्तानें अर्पण केलेलीं एक हजार केळींही भक्षिलीं. गोवाप्रांतीं शंकर नांवाच्या एका भक्तानें परम आनंदानें दिलेलीं चार हजार फळें खाऊन तीस घागरी दूध आचार्यांनीं प्राशन केलें ! हा अश्रुत व अदृष्टपूर्व आचार्यांचा जाठरप्रभाव पाहून सर्व लोक त्यांची स्तुति करूं लागले.

आचार्यांचा महिमा गोवा देशच्या राजास कळल्यावर त्यानें ह्यांनीं आपल्या राज्याबाहेर जाऊं नये म्हणून हुकूम केला. परंतु महात्म्यांना राजशासन केवळ तृणप्राय होय हें लोकनिदर्शनास येण्यासाठीं आचार्य एकदम अदृश्य झाले. अर्थात् राजाचे व राजसैनिकांचे प्रत्यत्न व्यर्थ झाले हें सांगणें नको. राजाची तीव्र इच्छा पाहून ते त्याच्या राज्यांत येऊन पुनः कांहीं दिवस राहिले असें कळतें. ह्याच राज्यांतील ' पशुव ' नांवाच्या गांवीं एके दिवशीं संगीत श्रवणोत्सव झाला. त्या वेळीं, गानमाहात्म्य इतकें मोठें आहे कीं, त्याच्यायोगानें हातांत धरलेल्या बीजांना अंकुर फुटून त्यांचा सपुष्पफल वृक्ष देखील होतो असें आचार्यांनीं जमलेल्या लोकांस सांगितलें. परंतु कांहीं लोकांना हें त्यांचें म्हणणें खरें वाटलें नाहीं म्हणून ही गोष्ट सप्रयोग सिद्ध करून दाखवावी अशी त्यांनीं आचार्यांस विनंती केली. ती त्यांनीं आनंदानें मान्य केली.

हनुमंत गाऊं लागले म्हणजे पाषाणदेखील पाण्याप्रमाणें विरघळून जात असें सांगतात. ह्या त्यांच्या गायनसामर्थ्याची परीक्षा पाह-

ण्यासाठीं तुंबरु आणि नारद हे उभयतां त्यांजकडे गेले, आणि त्रस्त होऊन तळमळले अशी कथा प्रसिद्धच आहे. आपण गानविद्येंत अद्वितीय सामर्थ्यवान् आहोंत अशा दृढ अहंकारानें तुंबरु आणि नारद यांनीं आपलें पांडित्य प्रदर्शित करण्याच्या इराद्यानें हनुमंतास गायनास आव्हान केलें. त्यांनीं गायनास प्रारंभ करितांच ज्या शिलेवर त्या उभयतांनीं आपल्या वीणा ठेविल्या होत्या ती शिला विरघळूं लागली. गायन समाप्त झाल्यावर तो द्रव यथापूर्व पाषाणरूप झाला. पाहतात तों वीणा त्या दगडांत अडकून अचाल्य झालेल्या दिसल्या. तेव्हां ते हीनगर्व होऊन हनुमंतास शरणागत झाले आणि त्यांच्या अनुग्रहानें आपापल्या वीणा परत मिळविल्या.

श्रीमन्मध्वाचार्यांनीं अशाच प्रकारें एकदां गायन करून बीजाचा सपुष्प व सफल वृक्ष हातांतल्या हातांत करून दाखविला. अशीं अलौकिक व अद्भुत कृत्यें करीत व सज्जनांवर अनुग्रह करून ठिकठिकाणीं स्वस्वरूप प्रकाशन अल्पस्वल्प करीत श्रीमदाचार्य गोवा देशांतून परशुरामक्षेत्रावरून संचार करीत महायशस्वी होऊन रजतपीठपुरास परत आले.

---

# भाग ८ वा.



## त्रिविक्रमपंडिताचार्य.

श्रीमदाचार्यांच्या अत्यद्भुत प्रभावानें मायावादास ग्लानि येऊन अद्वैतमत त्याज्य आहे असें लोकांना वाटूं लागलें. द्वैत सिद्धान्ताच्या अनुयायांची संख्या उत्तरोत्तर अधिकाधिक वाढत चालली. यामुळें अद्वैतमताचे नायक म्हणवून घेणाऱ्या लोकांना असह्य मत्सरानें ग्रासून टाकिलें. श्रीमदाचार्यांशीं द्वेष करणें हा या लोकांचा विषयच होऊन बसला. या वेळीं शंकराचार्यांचे मठाधिपति पद्मतीर्थ नांवाचे एक यति होते. हे पद्मतीर्थ, श्रीमन्मध्वाचार्यांशीं अनंतशयन, रामेश्वर, वगैरे ठिकाणीं वाद करून पराभूत झालेल्या विद्याशंकरांचे शिष्य होते. त्यांचे दुर्मंत्री द्वैतमताचा नायनाट जेणेंकरून होईल अशा उपायांचा शोध करण्यांत गुंतले. अद्वितीय महिमावान् तेजस्वी मध्वमुनींच्या मताचा परिणाम आमच्या समाजावर होऊन लोक त्यांस शरण जात आहेत; ह्या नूतन आचार्यांचे शिष्य जिकडे तिकडे प्रबल होत चालले आहेत; ह्यांचें वर्चस्व कमी होण्यास काय करावें ? असा प्रश्न ते आपापसांत विचारूं लागले. पद्मतीर्थांस त्या लोकांनीं सर्व वृत्तांत कळवून मध्वाचार्यांचें मत निर्मूल होण्यासाठीं शक्य ती खटपट करण्याबद्दल प्रार्थना केली. भाट्ट-प्राभाकर-बौद्ध-विजयाचार्य हें बिरुद धारण करणाऱ्या शंकराचार्यांच्या मताचें महत्त्व पाहतां आपण स्वस्थ बसून माध्ववृद्धि होऊं देणें बरोबर नाहीं; ज्ञानिश्रेष्ठ विद्याशंकरस्वामी ब्रह्मीभूत

झाल्यावर आमचे नायक आपण झालां; आतां आमचे उद्धारक आपणच आहां. असें त्या मंत्र्यांचें चिथावणीचें भाषण श्रवण करून पद्मतीर्थही उत्तेजित झाले. सवालक्ष अद्वैत ग्रंथांची पायमल्ली होत असलेली पाहून पद्मतीर्थांचें हृदय विदीर्ण होऊं लागलें. आचार्यांचें जगन्मोहन सौंदर्य पाहून साक्षात् व्यासच हे आहेत, साक्षात् वेदच ह्यांच्या रूपानें अवतरले असावेत असें वर्णन दृढ विश्वासबुद्धीनें लोक करूं लागलेले ऐकून पद्मतीर्थांना कानांत शिशाचा रस ओतल्याप्रमाणें होई. परंतु त्यांच्या हातून द्वैतमताचें प्राबल्य लवमात्रही कमी करवेना. तेव्हां वर लिहिल्याप्रमाणें मत्सरग्रस्त लोक त्यांना " तुम्हांला धन नाहीं, विद्या पुरेशी नाहीं, ऐश्वर्यही कमीच आहे, द्वैतमताचा उच्छ्रय तुम्हांला परमप्रिय दिसतो, घृत अग्नीशीं संबंध आल्यावरच विरघळतें, अग्नीचें नुसतें नांव ऐकून कांहीं विरघळत नाहीं, पण तुम्ही मात्र मध्वाचार्यांचें नांव ऐकूनच घाबरतां; न्यायानें असो अथवा अन्यायानें असो ' येन केन प्रकारेण ' शत्रूचा मुखभंग करण्याचा उपाय योजणें अवश्य आहे; या कामीं कालविलंब अगदीं अक्षम्य आहे असें म्हणूं लागले. हे चिथावणीचें भाषण श्रवण करून पद्मतीर्थांनीं शिष्यांच्या म्हणण्यास अनुमोदन दिलें. वादविवादानें आपला मनोरथ सिद्धीस न गेला तर इंद्रजाल विद्येनें तो सिद्धीस नेऊं. चालन, वशीकरण, स्तंभन, विद्वेषण, उच्चाटन, मारण इत्यादि कुमंत्रमार्गांनीं त्यांना मारून टाकूं असें त्या लोकांनीं पद्मतीर्थांस सांगितलें. माध्वांच्या निंदेचा तर त्यांनीं सर्वत्र भडिमार केला. " मध्वसिद्धान्त नवीन आहे, कल्पित आहे, श्रुतिस्मृतिविरुद्ध आहे " असा उत्क्रोश ते करूं लागले. परंतु लोकां-

वर या वल्गनांचा लवमात्र परिणाम झाला नाहीं व ते या कपटोपायांस हारही गेले नाहींत.

साक्षात् श्रीमदाचार्यांशीं वाद करून अपमानकारक वाक्यांनीं किंवा अन्य उपायांनीं त्यांचा धिक्कार करण्याच्या इराद्यानें पुंडरीकपुरी नामक एका पंडितंमन्य यतीला पुढें करून पद्मतीर्थ रजतपीठपुरास आले. ऋग्वेदाच्या अर्थासंबंधानें विचार सुरू झाला. तेव्हां पुंडरीकपुरी आचार्यांसमोर स्तब्धच झाला. श्रीमदाचार्य संहितेचा उपन्यास करून अर्थ सांगूं लागले. तो ऐकून पंडरीकपुरी घाबरूनच गेले; तोंडांतून शब्द निघेना, अंगास दरदरून घाम सुटला, कंठ दाटून येऊन त्यांना ग्लानि आली.

वाद चालू असतां ह्या पुरीला ‘ अग्निनारायिं ’ या वाक्याचा पदच्छेदसुद्धां सांगतां आला नाहीं. अर्थात् पद्मतीर्थादि मायावादी-लोक आचार्यांच्या समोर भ्रांतचित्त व भग्नाश होऊन पराजित झाले.

“ विष्णुमंगलदेशान्ते हृतां कंबलिकां निजाम् ।
श्रुत्वा रजतपीठस्थं एकवाटं ययौ गुरुः ॥
तत्रस्थं चोलजं दृष्ट्वा स्वशिष्यैस्तं रुरोध सः ।
त्वच्छास्त्रं साधयासि चेत् प्राश्निकानाह्वयेत्यसौ ॥
मध्वस्तेनोदितः प्रोचे ह्याह्वयेच्छसि चोदिति ।
कृतकृत्योऽस्मि मे शास्त्रं व्याप्तमित्युदितेऽमुना ॥
प्रोचे मध्वो मम व्याप्तं त्रैलोक्ये शास्त्रमित्यमुम् ।
अंतर्यामी हितं वेद तवेदं शाक्यभाषितम् ॥
इति ब्रुवाणं तं प्रोचे मध्वः स्मितमुखांबुजः ।
अंतर्यामी नियम्यश्च त्वयैवाङ्गीकृताविति ॥

मिलितेष्वथ सभ्येषु प्राश्निकेष्वभवत्कथा ।
तत्र माध्वउपन्यासग्रंथो वादाव्हयोऽभवत् ॥"
इति पंडिताचार्योदाहृतप्रमाणवाक्यानि ॥

सरळ राजमार्गानें आपला कपटोद्देश कांहीं सिद्धीस जात नाहीं हें पाहून ह्या चोलदेशस्थ यतींनीं छिद्रान्वेषी होऊन श्रीमदाचार्य व वैष्णवसिद्धान्ताची निंदा करण्यास जोरानें आरंभ केला. वादांत आचार्यांना जिंकून अद्वैताचें रक्षण करणें केवळ अशक्य समजून अन्य कोणत्या उपायांची योजना करावी ह्याचा विचार ते मायावादी करूं लागले. तेव्हां श्रीमदाचार्यांचा ग्रंथसंग्रह चोरून नेल्यानें त्यांचें मत उध्वस्त होईल असें त्यांच्या मनांनीं घेतलें. ग्रंथ हे दिव्यासारखे प्रकाशमूलक होत. तो विझविला म्हणजे जसा अंधार पडतो तसा पुस्तकेंच नाहींतशीं केल्यावर मध्वमताचा सर्वत्र फैलावलेला प्रकाश नष्ट होऊन पुनः अद्वैतमत यथाप्रकार रूढपद होईल हा त्यांचा भ्रामक समजुतीचा सारांश होता. कोंबड्याच्या अरवण्यानें अरुणोदयकाल सूचित होतो, तेव्हां कोंबडाच मारून टाकला तर अरुणोदय होणार नाहीं असें कांहीं मूढ लोक समजत असतात. एतादृश मूढपणानें पद्मतीर्थप्रभृतींनीं आचार्यांचा ग्रंथसंग्रह लांबविला. हा ग्रंथसंग्रह शंकराचार्य नांवाच्या एका ब्राह्मणाकडे असे. तो लिकुचवंशोत्पन्न त्रिविक्रमपंडिताचार्यांचा बंधु होता. त्याच्याद्वारें सर्व ग्रंथांचा अपहार करून चोर फार दूरवर गेले आणि त्यांनीं पुस्तकांचा बेपत्ता केला. शंकराचार्यानें पुस्तकें चोरीस गेल्याचा वृत्तांत श्रीमदाचार्यांस कळविला. तो ऐकून आचार्य आपल्या शिष्यपरिवारासह पद्मतीर्थ वगैरे लोक ज्या रस्त्यानें गेले

होते त्याच रस्त्यानें लागलीच गेले आणि प्राग्रयवाट नांवाच्या गांवीं त्यांनीं पद्मतीर्थांस गांठलें. आचार्य आल्याची वार्ता ऐकून मायावादी पद्मतीर्थादिक लोक तेथूनही पळून गेले. ह्या दिवशीं पौर्णिमा होती. श्रीमन्मध्वविजय व आणखी इतर अनेक प्रमाणांवरून श्रीमदाचार्यांच्या विद्येचा विलक्षण शोभायमान प्रभाव परकीय मत-स्थांच्या मनाला मोठा संतापदायक होत असे हें उघड दिसून येतें. त्यांच्या वाग्बलाचा प्रतिरोध करणें अशक्य असें खास समजून प्रायः कोणीही त्यांच्याशीं सामना म्हणून करीत नसत. आचार्यां-वर लोकांची भक्ति विशेषच जडत चालल्यामुळें ह्यांचा प्रत्यक्ष किंवा परोक्ष, निग्रह करणें अगदीं असाध्य झालें.

" आनंदतीर्थः पुंसिंहो मायावादिदितेः सुतान् ।
विदार्यंयुक्तिनखैररप्रतीपोऽभिभासते ॥
नृहरिस्सकलज्ञनामकः । समुपैति हि मायिदानवान् ॥
प्रपलायनमततः क्षमम् । त्वरया वो वसतिं गुहासु च ॥
द्रवत द्रवताशु मायिनः । प्रविशध्वमतन्द्रिता गुहाः ॥
कमलारमणाम्बराश्रयः । समुदेत्याखिलज्ञभास्करः ॥ "

असें पंडिताचार्यांनीं म्हटलें आहे. ग्रंथ चोरीस गेल्याची हकी-कत जयसिंहराजास कळल्यावर तो त्यांचें माहात्म्य जाणून आचा-र्यांवर अत्यंत प्रेम करूं लागला. त्याची भक्ति इतकी वाढली कीं, आपलें राजकीय मोठेपण आचार्यांच्या दैवी माहात्म्यापुढें कस्पटा-पेक्षांही कमी दर्जाचें आहे हें त्याच्या लक्षांत चांगल्या प्रकारें येऊन तो एकाद्या सामान्य सेवकाप्रमाणें त्यांची तनुमनोधनांनीं एकनिष्ठपणें सेवा करूं लागला. आचार्यांची सेवा करितांना राजेपणाची भ्रांति

त्याच्या मनाला शिवतदेखील नसे. पद्मतीर्थ वगैरे लोक काळु नांवाच्या आपल्या मुक्कामाच्या ठिकाणाहून पळून गेल्यानंतर श्रीमदाचार्यांनीं प्राग्यवाट येथेंच चातुर्मास्य निवास केला.

राजदंडाच्या भीतीनें चोरून नेलेलीं पुस्तकें परत आणून देऊन आचार्यांची कृपा संपादन करावी हें पद्मतीर्थांच्या अनुयायांस बरें वाटून त्यांनीं एका मध्यस्थाच्या घरीं पुस्तकें आणूनदेखील ठेविलीं. राजसेवकांनीं ही गोष्ट आचार्यांस श्रुत केली. परंतु चोरीस गेलेला आपला ग्रंथसंग्रह गुप्तपणें परत घेण्याचें त्यांनीं नाकारिलें.

चातुर्मास्यानंतर श्रीमन्मध्वाचार्य प्राग्र्यवाटाहून निघाले आणि स्तंभपदोपसर्जन नांवाच्या देशीं येऊन तेथील मदनाधिप देवालयांत कांहीं दिवस राहिले. येथून निघून आचार्यांनीं विष्णुमंगलास केलेल्या प्रयाणाचें अमृतोपमवर्णन पंडिताचार्यांनीं श्रीमन्मध्वविजयांत केलें आहे.

श्रीमदनाधिप देवालयांतील घांट वाजवून सर्व मंडळी मोठ्या संभ्रमानें निघाली. अनुयात्रिक होऊन चाललेली शेकडों शिष्य मंडळीच्या मध्यभागीं दिव्य तुलसीकमलाक्षमाला धारण करून मंदगतीनें चालत असलेली, आंतर व बाह्य अंधकाराचा परिहार करणारी मंगलमय, दिव्य तेजःपुंज श्रीमदाचार्यांची मूर्ति अत्यंत शोभायमान दिसत होती. चंद्रबिंबासारखें श्वेतछत्र उन्हाचा ताप निवारण करीत होतें. आचार्यांच्या अग्रभागीं चालणारे, बरोबर असणारे आणि मागून येणारे लोक श्रीहरिनामसंकीर्तन मोठ्या भक्तिभावानें करीत चालले होते. त्या मंगलध्वनीनें सर्व वातावरण व्याप्त होऊन जिकडे पाहावें तिकडे आनंदीआनंद दिसत होता. ठिक-

ठिकाणीं सुवासिनी स्त्रिया आपल्या स्वभावसहज मंजुलध्वनीनें आचार्यांच्या गुणांचें वर्णन गायनद्वारें करून त्यांना मंगलारत्या करीत होत्या. सामोरा आलेला महाराजा जयसिंह आपल्या रथांतून उतरून विनम्रभावानें आचार्यांस साष्टांग वंदन करून भक्तमंडळांत प्रविष्ट होऊन पायींच चालत होता. प्रतिमा, शालग्राम, सच्छास्त्रग्रंथ, देवांचा पूजासंभार वगैरे आपल्या खांद्यावरून घेऊन चालत असलेल्या पंडितप्रवरांच्या व लौकिकजनांच्या समवेत श्रीमन्मध्वाचार्य विष्णुमंगल देवालयास आले. पंचवीस गांवच्या लोकांनीं एकत्र जमून सकलवाद्यवैभवपूर्वक जयजयध्वनींनें त्यांचें स्वागत केलें. ते लोक श्रीमदाचार्यांचें दर्शन केव्हां होतें आणि आपण केव्हां कृतकृत्य होतों इतके आतुर झालेले होते. त्या अपूर्व उत्सवांत आपण वैकुंठांतीलच आनंदानुभव घेत आहों कीं काय असें सर्वांस वाटलें ! आचार्यांची ती परम सात्त्विक आणि सर्वोत्कृष्ट मूर्ति पापणीदेखील न हलवितां कितीही वेळ पाहात उभें राहिलें तरी कोणास पुरेसें वाटेच ना ! सर्व लोक रोमहर्षानें उन्मादपरवश होऊन त्यांच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचा प्रवाह वाहूं लागला ! विष्णुमंगल देवालयांत श्रीमदाचार्यांचें शुभागमन झाल्यापासून दररोज अहोरात्र सच्छास्त्राचा ऊहापोह होऊं लागला. आपले शिष्य हृषीकेशतीर्थ यांना श्रीमदाचार्यांनीं भागवत सांगण्यास प्रारंभ केला.

हा सच्छास्त्राच्या पाठप्रवचनाचा आनंदोत्सव चालला असतां त्रिविक्रमपंडिताचार्य ह्या नांवाचे एक महापंडित श्रीमदाचार्यांकडे आले. हे पंडित लिकुच कुलांत जन्मलेले असून ह्यांचें गोत्र आंगीरस होतें. ह्यांच्या वडिलांचें नांव सुब्रह्मण्याचार्य असें होतें. सवा-

लाख अद्वैतग्रंथ वाचोविधेय होईपर्यंत गुरूजवळ अध्ययन केलें होतें. ह्यांनीं केलेलीं उषाहरणादि ग्रंथरत्नें अखिल विद्वन्मंडलास परम मान्य आहेत. ह्यांची कवित्वशक्ति कालिदासाप्रमाणें किंबहुना कांकणभर अधिकच प्रतिभाशाली होती. म्हणून ते ‘ कविकुलतिलक ’ या बहुमानाच्या पदवीस पात्र झाले. भानुप्रभृति महापंडित प्रभाकर यांच्यापुढें केवळ खद्योतप्राय होते असें सांगतात. हे महापंडिताग्रणी आचार्यांकडे आल्यापासून वाग्वादाची संधि केव्हां मिळेल या विवंचनेंत होते. मायावादांत यांच्यासारखा सर्वश्रेष्ठ अधिकारसंपन्न पुरुष त्या वेळीं अखिल महीमंडलावर कोणी नव्हता असें म्हणतात. मायावादांत एवढा अधिकार यांचा असतांही चित्ताला कांहीं शांति नव्हती. अद्वैत मत खरें म्हणावें तर तें बौद्धमताच्याच तोडीचें दिसतें, आणि द्वैत खरें म्हणावें तर तसाही मनाचा निश्चय होईना; अशी दोलायमानवृत्ति त्यांची झाली होती. अशा स्थितींत निर्याणसमयीं त्रिविक्रमपंडिताचार्यांचे वडील सुब्रम्हण्याचार्य यांनीं अद्वैतमत मोक्षोपयोगी नाहीं असा विश्वासमांद्य उत्पन्न करणारा उपदेश ह्यांस केला होता. त्याचें त्यांना पदोपदीं स्मरण होत असल्याकारणानें तत्त्वबुभुत्सु होऊन त्रिविक्रमपंडिताचार्य श्रीमदाचार्यांकडे आले असावे असें दिसतें.

कुंबळे येथील महाराजा जयसिंह हा विष्णुमंगलाहून परत जाण्यास निघाला तेव्हां त्यानें श्रीमदाचार्यांचा सर्वोत्कृष्ट सन्मान करून त्यांचा अनुग्रह संपादन केला. चोरांनीं नेलेला ग्रंथसंग्रह मध्यस्थाच्या द्वारें परत घ्यावा म्हणून त्यानें केलेली प्रार्थना आचार्यांनीं मान्य करून तो पूर्ववत् शंकराचार्यांच्याच येथें असूं दे असें सांगितलें.

विष्णुमंगलाहून श्रीमदाचार्य अमरालय नांवाच्या गांवास गेले. तेथें सूत्रभाष्याचें प्रवचन करण्यास त्यांनीं प्रारंभ केला. तेव्हां श्रोतृ-जन-समूहांत त्रिविक्रमपंडित प्रत्यहीं येऊन बसत. योग्य प्रसंग पाहून त्यांनीं आचार्यांशीं वादविवादास प्रारंभ केला. एकसारखें पंधरा दिवसपर्यंत उभयतांचें अप्रतिहत वाग्युद्ध झालें. शेवटीं पंडितांचा पराजय होऊन ते श्रीमदाचार्यचरणांचे दास झाले.

ह्या वादांत श्रीमदाचार्यांनीं निरीश्वरसांख्य, निरीश्वरभाट्ट, प्राभाकर इत्यादि मतांचा निरास करून वेदप्रामाण्य प्रस्थापित केलें आणि ब्रह्मपरिणामवादास जिंकून पाशुपत, गाणपत्य, स्कांद, सौर इत्यादि मतांचें खंडन केलें. परमात्मा अनंतकल्याणगुणपरिपूर्ण आहे हें न मानतां यौक्तिक हें नांव मात्र धारण करणाऱ्या वैशेषिकांचें दर्शन सर्वथा अग्राह्य आहे असें निरूपण करून त्यांना प्रेमास्पद असलेला समवाय पदार्थ आणि त्याचें एकत्व हीं प्रमाणविरुद्ध आहेत असें त्यांजकडून कबूल करविलें. 'विशेष' नामक पदार्थानें अभिन्न वस्तूंच्या ठिकाणीं भेदकार्य निर्वाह होतो असें आचार्यांनीं सिद्ध केलें. विचार करून पाहतां शून्यवाद आणि मायावाद हे कांहीं भिन्न नाहींत, यांत भेद असलाच तर तो केवळ नाममात्र आहे, अर्थतः वैलक्षण्य कांहीं नाहीं असा उपन्यास त्यांनीं केला. अद्वै-ताचार्य यद्यपि आपणांस बौद्धविजयी म्हणवून घेतात तथापि ते प्रच्छन्न बौद्धच होत हें उघड आहे. मुक्ति म्हणजे निर्विशेष स्थिति असें परकीयांच्या मतें जर आहे तर ही सुखलेशशून्यमुक्ति प्रार्थ-नीय अथवा अपेक्षणीयही पण नाहीं असें श्रीमदाचार्यांनीं सप्रमाण-सिद्ध केलें.

" अनंतगुणपरिपूर्ण श्रीमन्नारायणच एक सर्वोत्तम आहे; जीव जडात्मक प्रपंच त्याजहून भिन्न असून त्याच्या अधीन आहे; वैराग्य, भक्ति, उपासना आणि अपरोक्षज्ञान हीं साधनें आहेत; मोक्षप्राप्ति भगवत्प्रसादानें होणारी आहे; मोक्षांत आनंदतारतम्य आहे; दुःख सर्वथा नाहीं; मुक्तजीव परमात्म्याहून भिन्न आहेत; स्वस्वयोग्यसुख स्वस्वरूपानें अथवा सद्योनिर्मित देहादि विषयद्वारा सालोक्य, सामीप्य, सारूप आणि सायुज्य नामक विविध मोक्षभोग अनुभविणारे मुक्त होत " असा सकल श्रुतिसंमत अर्थ आचार्यांनीं मोठ्या अधिकारयुक्त भाषेनें सांगून सज्जनांच्या हृद्गुहेंत ज्ञानाचा प्रकाश पाडिला. त्रिविक्रमपंडितांनीं वादांत पराजित झाल्यावर श्रीमदाचार्यांच्या चरणसन्निधानींच सूत्रभाष्याचें अध्ययन करून त्यांच्या आज्ञेवरून " तत्त्वप्रदीप " नांवाचा एक टीकाग्रंथ केला. भाष्याचा अर्थ आणखी विशद होण्यासाठीं दुसरा एक ग्रंथ रचावा म्हणून त्यांनीं श्रीमदाचार्यांस प्रार्थना केली. ती मान्य करून त्यांनीं " अनुव्याख्यान " नांवाचा एक ग्रंथ केला. ह्याचे चार अध्याय असून ते चौघा शिष्यांस एकसमयावच्छेदेंकरून सांगून आचार्यांनीं त्यांजकडून लिहविले. त्यांनीं एकंदर सदतीस ग्रंथ केले. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:—१ गीताभाष्य, २ गीतातात्पर्य, ३ सूत्रभाष्य, ४ अणुभाष्य, ५ श्रीमन्महाभारततात्पर्यनिर्णय, ६ भागवततात्पर्य, ७ नखस्तोत्र, ८ यमकभारत, ९ द्वादशस्तोत्र, १० तंत्रसार, ११ सदाचारस्मृति, १२ यतिप्रणवकल्प, १३ जयन्तीनिर्णय, १४ ऋग्भाष्य, १५ प्रमाणलक्षण, १६ कथालक्षण, १७ तत्त्वसंख्यान, १८ तत्त्वविवेक, १९ मायावादखंडन, २०

उपाधिखंडन, २१ प्रपंचमिथ्यात्वानुमानखंडन, २२ तत्त्वोद्योत, २३ विष्णुतत्त्वनिर्णय, २४ ऐतरेयभाष्य, २५ तैत्तिरीयभाष्य, २६ बृहदारण्यकभाष्य, २७ ईशावास्यभाष्य, २८ काठकभाष्य, २९ छांदोग्यभाष्य, ३० आथर्वणभाष्य, ३१ मांडूक्यभाष्य, ३२ षट्प्रश्नभाष्य, ३३ तलवकारभाष्य, ३४ अनुव्याख्यान, ३५ संन्यासविवरण, ३६ कृष्णामृतमहार्णव आणि ३७ कर्मनिर्णय.

---

## भाग ९ वा.



### बदरिकागमन.

परमात्म्याची अखंड सेवा करण्यांत मग्न होऊन सज्जनोद्धारपूर्वक दिग्विजय करीत व जयसिंह महाराजासारखा राजपुरुष व त्रिविक्रम पंडिताचार्यांसारखा महापंडित यांजकडून सेवा घेत भगवत्पूजा, प्रवचन, अध्ययन, ग्रंथरचना इत्याद्यनेक शुद्ध, सात्त्विक मार्गांनीं लोकशिक्षणाचें पवित्र महत्कार्य श्रीमदाचार्यांनीं पुष्कळ वर्षें केलें. इकडे त्यांचे आईबाप पाजक क्षेत्रांतच राहून आपला वृद्धापकाळ घालवीत होते. ते कालधर्मानुसार इहलोकाची यात्रा संपवून वैकुंठलोकीं गेले. आचार्यांचे बंधु महाबुद्धिमान् होते. त्यांनीं आईबापांची मनोभावें सेवा करून पुत्रधर्माचें उत्तम प्रकारें परिपालन केलें. वैकुंठवासी मातापितरांची और्ध्वदेहिक क्रिया वगैरे झाल्यावर कृतकृत्य होऊन इतःपर गृहस्थाश्रम अनुसरणें अवश्य नाहीं अशा

विरक्तबुद्धीनें ते श्रीमदाचार्यांस शरणागत झाले. घडलेला सर्व वृत्तांत आचार्यांस सांगून त्यांनीं आपणास संन्यास देण्याविषयीं त्यांची प्रार्थना केली. हे स्वभावतःच विरक्त होते. ऐहिक संपत्ति नष्ट होऊन दारिद्र्यावस्था आल्यामुळें ह्यांना थोडे क्लेशही भोगावे लागले असें कळतें. भावाचा मनोभाव समजून समयोचित उपदेशानें आचार्यांनीं त्यांचें समाधान केलें व चातुर्मास्यानंतर तुमचे मनोरथ पूर्ण होतील असें सांगून त्यांस घरीं परत पाठविलें. शरत्काल संपल्यावर जयसिंह महाराजाच्या देशाहून आचार्य पाजक क्षेत्रास आले. या वेळीं त्या राजाला आचार्यांच्या वियोगाचें दुःख दुःसह झालें. समुचित उपदेशानें त्याचें समाधान त्यांनीं केलें. पाजक क्षेत्रास येऊन मातापितरांचीं वार्षिक कृत्यें म्हणजे श्राद्ध वगैरे झाल्यावर आचार्यांनीं आपल्या सोदर बंधूला यत्याश्रम देऊन त्याजवर अनुग्रह केला व त्यांचें नांव विष्णुतीर्थ असें ठेविलें.

उडुपी येथील आठ मठांच्या आद्य अधिपतींना एकाच वेळीं उत्तमाश्रमाची दीक्षा आचार्यांनीं दिली. याप्रकारें संन्यस्त झालेल्या शिष्यांपैकींच विष्णुतीर्थ हेही एक होते. त्या सर्वांचीं नांवें व त्यांच्या मठांचीं नांवें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत.

१ विष्णुतीर्थ .... .... सोदेमठ.
२ जनार्दनतीर्थ .... .... कृष्णापुरमठ.
३ वामनतीर्थ .... .... काणूरमठ.
४ नरसिंहतीर्थ .... .... अघमारुमठ.
५ उपेन्द्रतीर्थ .... .... पुत्तिगेमठ.
६ रामतीर्थ .... .... शीरूरमठ.

७ हृषीकेशतीर्थ .... .... पलिमारुमठ.

८ अक्षोभ्यतीर्थ .... ... पेजावरुमठ.

विष्णुतीर्थ हे महातपस्वी होते असें कळतें. घोर तपाचरण करून त्यांनीं अनेक तीर्थयात्रा व क्षेत्रयात्रा केल्या. हरिश्चंद्रगिरींतील गुहेंत जाऊन ते एकान्त समाधींत मग्न होत असत. निराहार करून शरीरशोषणाच्या द्वारें त्यांनीं इंद्रियें आपल्या अंकित केलीं होतीं. अर्थात् ते जितेंद्रिय होते. पर्वताच्या पायथ्याशीं शिष्यांनीं थोडेंसें पंचगव्य आणून ठेवावें व तें ह्यांनीं भगवन्निवेदनानंतर पांच दिवसांनीं एकदा प्राशन करावें असा क्रम होता. ह्या योगानें त्यांच्या क्षुधेचें निवारण होत असे. सामान्य जन जेथें एक दिवस देखील राहूं शकणार नाहींत अशा दुर्गम्य प्रदेशांत गिरिशिखरांच्या आश्रयानें राहून हे श्रीहरिचरणकमलांचें सतत ध्यान करीत असत. विष्णुतीर्थांच्या शिष्यमंडळींत अनिरुद्धतीर्थ, बादरायणतीर्थप्रभृति ज्ञानवैराग्य-संपन्न भक्तिमान् शिष्य मोठे प्रबल होऊन गेले. सरते शेवटीं विष्णुतीर्थांनीं सह्याद्रीवर जाऊन अत्युन्नत अशा सुब्रह्मण्यनामक ठिकाणीं आपला मठ स्थापिला.

पूर्वाश्रमांत शोभनभट्ट या नांवानें विख्यात झालेल्या पंडितांना श्रीमदाचार्यांनीं यत्याश्रमाचा लाभ करून देऊन त्यांचें नांव पद्मनाभ-तीर्थ असें ठेविलें. हे त्यांचे पट्टशिष्य होते. याशिवाय नरहरितीर्थ, माधवतीर्थ, अक्षोभ्यतीर्थप्रभृति पुष्कळ संन्यस्त शिष्य आचार्यांच्या अनुग्रहानें धन्य झाले.

गृहस्थाश्रमी शिष्यवर्गांत त्रिविक्रमपंडिताचार्य, व त्यांचे बंधु शंकराचार्य, त्यांच्याच भाऊबंदांपैकीं दुसरे एक शंकराचार्य

इत्यादि मंडळी मोठी प्रबल होती. आधुनिक विचारांचे लोक श्रीमदाचार्यांचा महिमा न जाणतां नानाप्रकारच्या कुचोद्य कल्पना करीत बसतात. त्यांनीं असें कोणतें महत्कृत्य केलें कीं ज्यासाठीं इतके त्यांचे देव्हारे माजावे असेंही अप्रबुद्धपणें ते विचारितात. आचार्यांचा सर्व महिमा जाणणें हें मानवी बुद्धीच्या अटोक्याबाहेरचें काम आहे; तथापि त्यांच्या ग्रंथांचें अवलोकन करून त्यांतील भावगंभीर वाक्यें पठन करणारे, आचार्यांच्या वेळीं त्यांच्या समक्ष सेवेंत राहून ह्या भक्तिमूर्ति प्रभूचें ज्योतिर्मय शरीर अवलोकन करून आनंदित झालेले भाग्यवान् लोक, ह्या सर्वज्ञ शिरोमणीचा वाणीझर्झर श्रवण करून त्याच्या नादानें व अर्थवैचित्र्यानें पुलकोद्रिक्त झालेले महापंडित आणि देशसंचार करीत असतां मधून मधून ठिकठिकाणीं आपली अलौकिक व अद्भुतशक्ति प्रकट करून लोकांचें विश्वासमांद्य ज्यांनीं दूर केलें त्या ह्या आचार्यश्रेष्ठांनीं ज्यांच्यावर अनुग्रह केला ते ह्यांचे अनुचर, कांहीं थोडें थोडें ह्यांचें माहात्म्य जाणतात. "नोलूकोऽप्यवलोकते यदि दिवा सूर्यस्य किं दूषणम् ?" हें एवढें उत्तर आचार्यनिंदकांना पुरें आहे.

गोमती नदीच्या तीरीं एक राजा ऐश्वर्यमदानें अंध होऊन शास्त्र हें व्यभिचरितफलात्मक आहे असें अधिक्षेपपूर्वक म्हणत असे. तेव्हां आचार्यांनीं प्रत्यक्ष दृष्टान्तानें त्याचें अज्ञान ध्वस्त केलें. "या ओषधीः" या सूक्ताच्या पठनानें हातांत धरलेलें बीज अंकुरित होऊन त्याचा पुष्पफलाढ्य वृक्ष होतो असें शास्त्रांत सांगितलें आहे असें म्हणतांच हें म्हणणें खोटें आहे असें तो राजा बोलला. तेव्हां श्रीमदाचार्यांनीं हातांत बीज घेऊन सूक्तपठनास

प्रारंभ करितांच तें अंकुरित होऊन पुष्पफलयुक्त झालें. हें पाहून राजा आश्चर्यचकित होऊन शास्त्राज्ञा खरी मानूं लागला.

श्रीमदाचार्यांनीं एकदां मध्य रात्रीं, प्रकाश नसतां, आपल्या अंगुष्ठनखाच्या प्रकाशांत अध्यापनाचें काम केलें. कोडंजाडीगंडवाट या नांवाच्या एका बलिष्ठ मनुष्यानें व त्याच्या भावानें आचार्यांच्या शक्तिमत्तेची परीक्षा केली. हे सहोदरबंधु, तीस माणसांना उचलतां न येणारा श्रीकांत देवालयाचा ध्वज एकेकटेच उचलून सहज घेऊन हिंडत असत. परंतु आचार्यांचा नुसता अंगठा देखील यांना हलवितां आला नाहीं. अशा अद्भुत शक्तिसागर आचार्यांनीं एका बाल ब्रह्मचाऱ्याच्या खांद्यावर बसून श्रीनृसिंहाच्या देवालयास प्रदक्षिणा केली. या वेळीं आपलें वजन कापसापेक्षांही हलकें होऊं शकतें असें त्यांनीं लोकनिदर्शनास आणिलें. दुसऱ्या एका प्रसंगीं पूर्ववाट नांवाच्या एका महाबलाढ्य मनुष्यास शक्य तितक्या जोरानें आपला कंठ पाशबद्ध करण्यास आचार्यांनीं सांगितलें. त्याप्रमाणें जोराचा पाश गळ्यास बसला असतांही अनायासें त्यांनीं नेहमीं-प्रमाणें सुस्वरानें उपन्यास केला. भद्रानदीच्या तीरीं प्राचीन काळीं हजारों माणसांनीं मिळून एक मोठा पाषाण, त्या नदीवर लोकोपकारार्थ सेतूप्रमाणें ठेवावा म्हणून आणून ठेविला होता. परंतु ज्या ठिकाणीं तो ठेवावयाचा होता त्या ठिकाणीं पाणी फारच खोल असून त्याला ओढही मनस्वी होती; व पाषाणही अशक्यभार असल्यामुळें तो उचलून नदीवर ठेवणें त्या वेळीं शक्य झालें नाहीं. यासंबंधानें लोकांनीं शेकडों वर्षें केलेले प्रयत्न व्यर्थ झाले होते. ही गोष्ट आचार्यांस कळतांच ती शिला त्यांनीं आपल्या डाव्या हातानें सहज

उचलून योग्य स्थळीं ठेविली. ह्या जनोपकारक कृत्यामुळें लोकांस फार आनंद झाला व आचार्यांची विलक्षण शक्ति व्यक्त झाली. ही शिला म्हैसूर इलाख्यांतील बळेहोन्नूर तालुक्यांत म्हैसूरापासून चोवीस मैलांवर कलश नांवाच्या गांवाजवळ असून तिजवर "**श्रीमदाचार्यैरेकहस्तेनानीय स्थापिता शिला**" असे शब्द लिहिलेले आहेत. ही "भीमाची शिला" या नांवानें प्रसिद्ध आहे.

असें अनेक स्थळीं आपलें अद्भुत व अपरिमित सामर्थ्य प्रकट करून आपण साक्षात् मरुदवतार आहों ही गोष्ट श्रीमदाचार्यांनीं विशद करून दाखविली. पारंती देवालयांत देवाची पूजाअर्चा कैक वर्षांपासून बंद पडली होती. ती ह्यांनीं अधिकाऱ्यांच्या मनांत प्रेरणा करून अर्ध्या दिवसांत मोठा उत्सव करून सुरू करविली. मंगळूर जिल्ह्यांत कुमारधारा व नेत्रावती ह्या नद्यांच्या मधील प्रदेशांत एकदां भयंकर दुष्काळ पडला होता. त्याचा परिहार आचार्यांनीं केला. ह्यांचें माहात्म्य न जाणतां तेथील राजा ह्यांना शासन करण्याच्या विचारांत होता; परंतु त्यांचा लोकोत्तर अगाध महिमा पाहून तो आचार्यांच्या चरणीं शरणागत झाला. धन्वंतरी क्षेत्रांत एका भक्तावर अनुग्रह करण्यासाठीं त्यांनीं श्रीकृष्णामृतमहार्णव नांवाचा ग्रंथ करून त्यास दिला.

उच्चभूति नांवाच्या गांवीं "**वैषट्टेनान्हां**" ह्या कर्मकांड श्रुतीच्या अर्थाविषयीं वाद झाला. पूर्वपक्षाचे लोक, आचार्य संन्यासी आहेत, तेव्हां त्यांना कर्मकांडाचें परिज्ञान नसेल अशा समजुतीनें गर्वानें फुगून जाऊन उद्धट झाले होते. परंतु योग्य प्रमाणांनीं प्रतिवाद्यांचें समाधान करून आचार्यांनीं त्यांचा मदभंग केला आणि महानाम्नी व्याख्यानरूप कर्मनिर्णय या नांवाचा ग्रंथ केला.

गरीब शिष्यांच्या घरीं अल्प अन्नानें पुष्कळ लोकांस आचार्य भोजन घालीत आणि धनिकांच्या येथें ते लोकोत्तर भोजन करीत.

वर लिहिलेला वृत्तांत केवळ उदाहरणमात्र आहे असें समजावें. आचार्यांच्या चरित्रामृताचें सेवन संपूर्णपणें करण्यास देवादिक सुद्धां समर्थ नाहींत. मग मानवांची गोष्ट कशाला ? कृतकृत्य होऊन लोक-दृष्टीस अदृश्य होण्याचा काळ जवळ येत चालला तेव्हां आचार्य कांहीं महिने कण्वतीर्थांत राहिले होते असें कळतें. त्यांनीं या ठिकाणीं चातुर्मास्य बसून ऐतरेयोपनिषदाचें विशेष अध्यापन केलें असावें असें वाटतें. एकदां सूर्यग्रहण आलें असतां समुद्रस्नान करून वाळवंटांत ऐतरेयाच्या अर्थाचें प्रकाशन उपन्यासद्वारा श्रीमदाचा-र्यांनीं केलें. या वेळीं मोठा उत्सव झाला असें सांगतात.

श्रीमदाचार्य अदृश्य होण्यापूर्वीं थोडे दिवस नरहरितीर्थ यति-वरांनीं मूलरामसीता यांच्या प्रतिमा आश्विन शुद्ध पंचमीचे दिवशीं त्यांस आणून दिल्या. तीन महिने सोळा दिवसपर्यंत त्यांची स्वतः पूजा करून त्या आपले यतिशिष्य पद्मनाभतीर्थ यांना आचार्यांनीं दिल्या. वेदविरुद्ध मतांचें खंडन, वैदिकमताचें मंडन, सद्धर्म संस्था-पनपूर्वक हरिसर्वोत्तमत्व व वायुजीवोत्तमत्व ज्ञानाचा प्रसार, आसेतु हिमाचल करून पिंगल संवत्सराच्या माघ शुद्ध नवमीचे दिवशीं ऐतरेयप्रवचन करीत, देवादिक पुष्पवृष्टि करीत असतां अवर्णनीय समारंभानें **श्रीमदानंदतीर्थभगवत्पादाचार्य** लोकदृष्टीस अदृश्य झाले. बदरिकाश्रमांत श्रीमद्बादरायणाच्या सन्निधानीं शिष्यगणांत शास्त्रार्थ अवलोकन करण्यांत रत होऊन श्रीमन्नारायणाच्या अनंत-

कल्याणगुणगणामृताचें सेवन करीत श्रीमदाचार्य अद्यापि वास करीत आहेत, अशी सद्वैष्णवांची भावना आहे.

“ नमस्ते प्राणेश प्रणतविभवायावनिमगाः ।
नमः स्वामिन् रामप्रियतम हनूमन् गुरुगुण ॥
नमस्तुभ्यं भीम प्रबलतम कृष्णेष्ट भगवन् ।
नमः श्रीमन्मध्व प्रदिश सुदृशं नो जय जय ॥
इति निगदितवन्तस्तत्र वृंदारकेन्द्राः ।
गुरुविजयमहं तं लालयन्तो महान्तम् ॥
ववृषुरखिलदृश्यं पुष्पवारं सुगंधं ।
हरिदयितवरिष्ठे श्रीमदानंदतीर्थे ॥ ”

श्रीमध्वविजय.

---

# भाग १० वा.



## कालनिर्णय.

श्रीमदाचार्य पाजकक्षेत्रांत कधीं अवतरले याविषयीं इतिहासज्ञांत मतभेद आहे. त्यांचें जन्मसंवत्सर विलंबि असून पिंगल संवत्सरांत ते बदरिकाश्रमीं गेले याविषयीं बरींच ऐतिहासिक प्रमाणें दिसतात.

रा. भीमराव स्वामिराव कामलापुर यांनीं धारवाड येथें ' **सत्कथा** ' नांवाचें एक पुस्तक छापविलें असून त्यांत गुरुपरंपरादर्शक एक वृक्षही दिला आहे. त्यांत आचार्य शके १०४० ह्या वर्षीं संन्यस्त झाले व शके ११२० त बदरिकाश्रमास गेले असें लिहिलें आहे.

सालेमचे रा० सुब्बाराव यांनीं ' गीताविवृति ' या ग्रंथाचा अर्थ इंग्रजींत लिहिला आहे. त्याच्या प्रस्तावनेंत त्यांनीं हाच भावार्थ विस्तारानें लिहिला आहे. शके १०४० ह्या वर्षीं श्रीमदाचार्यांनीं संन्यासाश्रम घेतला असेल तर त्या वेळीं त्यांचें वय बारा अगर सोळा वर्षांचें असावयास पाहिजे. यावरून ते शके १०२५ अथवा १०२९ या वर्षीं जन्मले असें त्यांनीं म्हटलें आहे. विलंबी संवत्सर शके १०४० या वर्षीं आणि पिंगळसंवत्सर शके ११२० ह्या वर्षीं येतो. हीं वर्षें अनुक्रमें आश्रम घेतल्याचीं व बदरिकागमनाचीं होत असें रा० सुब्बरावजी सांगतात.

मठांत असलेल्या गुरुपरंपरावृक्षांत वरील विवेचनानुसार संवत्सरें लिहिलेलीं आहेत त्यांवरून शके १२२० च्या पिंगळनाम

संवत्सराच्या माघ शुद्ध नवमीचे दिवशीं श्रीमदाचार्य अदृश्य झाले असें दिसून येतें.

ह्याविरुद्ध कांहीं प्रमाणें आहेत. कोणी आचार्य शके ११२१ त जन्मले असें सांगतात. दक्षिणकानडा जिल्ह्याच्या रिपोर्टांत जन्मकाल शके ११२१ ( इ० स० ११९९ ) हा आहे असें लिहिलें आहे. सुमारें शंभर वर्षांपूर्वीं डॉक्टर बुकॅनन् नांवाच्या एका युरोपियन प्रवाशानें उडुपी येथील आठही मठांच्या स्वामींना भेटून पंडितांची सभा भरवून शके ११२१ हें आचार्यांचें जन्मवर्ष आहे असें ठरविलें. हा काल खरा मानला तर विलंबि संवत्सरांत त्यांचा जन्म झाला अथवा त्यांनीं संन्यास घेतला असें म्हणतां येणें अशक्य आहे. हें संवत्सर मठांतील वंशवृक्षाशीं अगदींच विरुद्ध आहे.

श्रीमदाचार्यांनीं श्रीमन्महाभारत तात्पर्यनिर्णयाच्या बत्तिसाव्या अध्यायांतील १३१ व्या श्लोकांत सांगितलेला अभिप्राय ह्या बाबतींत विचार करण्यासारखा आहे. तो असाः—

" चतुस्सहस्रे त्रिशतोत्तरे गते । संवत्सराणां तु कलौ पृथिव्याम् ॥
जातः पुनर्विप्रतनुस्स भीमो । दैत्यैर्निगूढं हरितत्त्वमाह ॥
तदैव कृष्णापि भुवि प्रजाता । प्रीत्यै हरेरंधतमस्यपातयत् ॥
महासुरान् विष्णुपरार्जुनाद्याः । कृते प्रजाता हरितोषणाय ॥ "

त्याचप्रमाणें नवव्या अध्यायाच्या शंभराव्या श्लोकांत त्यांनीं—

" गते चतुस्सहस्राब्दे तमोगास्त्रिशतोत्तरे । "

असें सांगितलें आहे. म्हणजे कलियुगाच्या ४३०० व्या वर्षीं आचार्य जन्मले असें मानलें तर शक संवत्सर ११२३ हा जननकाल म्हणून सांगण्यासाठीं उदाहरिलेलें वाक्य प्रमाणभूत होऊं शकेल.

छलारिस्मृतिकारांनीं—

“ एकादशशते शाके विंशत्यष्टयुगे गते ।
अवतीर्णं मध्वगुरुं सदा वन्दे महागुणम् ॥ ”

असें लिहिलें आहे. यावरून अठ्ठाविसाव्या कलियुगांत शके ११०० ह्या वर्षीं आचार्यांचा जन्म झाला असें आपाततः दिसतें.

वायुपुराणोक्त ब्रह्मकृष्णसंवादांतील श्रीमन्मध्वमाहात्म्यवर्णनांत

“ विलंबिवत्सरे शुद्धे माघे मकरगे रवौ ।
सप्तम्यां च रवीवारे सुनक्षत्रे शुभेदिने ॥
द्वात्रिंशल्लक्षणैर्युक्तो तेजोमयवपुस्तदा ।

.... .... .... .... ....

प्राप्ते तु पंचमे वर्षे ब्राह्मणं कृतवान् पिता ॥
पंचसंवत्सरादूर्ध्वं चरन्नन्वेषयद्गुरुम् ॥
सप्तसंवत्सरादूर्ध्वं गच्छन् बदरिकाश्रमम् ”

असें लिहिलें आहे. तें पाहतां आचार्यांचा जन्म विलंबि संवत्सरांत झाला असें दिसतें. पांचव्या वर्षीं उपनयन, अकराव्या वर्षीं संन्यास आणि अठराव्या वर्षीं गीताभाष्याची रचना अशा गोष्टी घडल्याचें कळून येतें. ह्या प्रमाणावरून शक संवत्सर कोणतें याचा बोध होत नाहीं.

आचार्य विलंबि संवत्सरांत आश्विन शुद्ध दशमीचे दिवशीं बुधवारीं जन्मास आले असें उडुपी येथील मठांत असलेल्या पुरातन पुस्तकांवरून कळून येतें. ह्याप्रकारें पुराव्यांत परस्पर विरोध व अभिप्रायभेद असल्या कारणानें ‘ इदमित्थं ’ म्हणून निश्चयानें सांगतां येणें शक्य नाहीं. तथापि शके ११६० च्या विलंबि

संवत्सरांत आचार्यांचा जन्म होऊन शके १२३९ च्या पिंगल-संवत्सरीं ते अदृश्य झाले; म्हणजे ऐंशी वर्षेपर्यंत ते मनुजदृष्टिगोचर होते असें आम्हांस वाटतें.

ह्या अभिप्रायाची उपपत्ति खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

१ पद्मनाभतीर्थ आणि नरहरितीर्थ हे आचार्यांचे साक्षाच्छिष्य होते. पद्मनाभ सात वर्षें संस्थानचे अधिपति होते. त्यांच्या मागून नरहरितीर्थांनीं नऊ वर्षें आधिपत्य केलें. अर्थात् आचार्यांच्या अंतर्धानाला आणि नरहरितीर्थांच्या वृंदावनाला अंतर फक्त सोळा वर्षांचें पडतें. नरहरितीर्थ कालिंगनगरांत राज्यकारभार करीत होते ही गोष्ट शिलालेखावरून व्यक्त होते. गंजम जिल्ह्यांत, श्रीकूर्म, विशाखपट्टण, सिंहाचल इत्यादि ठिकाणीं असलेल्या शिलालेखांत ११८६, १२०३, १२१४ आणि १२१५ हीं शकसंवत्सरें स्पष्टपणें दिसतात.

नरहरितीर्थांनीं शके १२०३ त श्रीकूर्मक्षेत्रांत योगानंदनृसिंह देवालयाची स्थापना केली.

" स्वस्तिश्रीशकवत्सरे हुतवहव्योमद्वयक्ष्मायुते ।
मेषे शुक्लशशांकशेखरदिने वारे च सौम्ये वरे ॥
प्रासादं कमठाधिपस्य पुरतो निर्माय शर्मप्रदो ।
योगानंदनृसिंह एष भगवान् प्रीत्या प्रतिष्ठापितः ॥ १ ॥ "

असा शिलालिखित श्लोक आहे. ह्या देवालयाच्या स्थापनेनंतर मूलराम व सीता यांच्या प्रतिमा त्यांनीं श्रीमदाचार्यांस आणून दिल्या. कांहीं दिवस आचार्यांनीं त्यांची पूजा करून पिंगलसंवत्सरीं

ते अदृश्य झाले. हें पिंगलसंवत्सर म्हणजे शके १२३९ तील पिंगलसंवत्सरच होय; दुसरें असणें संभवनीय नाहीं.

२ अक्षोभ्यतीर्थ हेही एक श्रीमन्मध्वाचार्यांचे साक्षाच्छिष्य होते. आचार्य अदृश्य झाल्यावर तेहतीस वर्षांनीं ते संस्थानचे अधिपति झाले. ह्यांनीं सतरा वर्षें धर्मराज्य चालविलें आणि नंतर हे वृंदावनस्थ झाले. हे यतिवर्य विद्यारण्य व वेदांतदेशिकाचार्य ह्यांचे समकालीन होते. शृंगेरी मठाचे विद्यारण्ययति शके १२५३ पासून १३०८ पर्यंत आणि रामानुजीय संप्रदायाचे वेदांतदेशिकाचार्य शके ११९१ पासून १२९९ पर्यंत विद्यमान होते. असें कळून येतें. विद्यारण्यस्वामींनीं विजयनगर संस्थानच्या बुक्क राजाचे मंत्री होऊन शके १२६८ ह्या वर्षीं शृंगेरी मठाला जहागिरी, इनामें, गांवें, जमिनी वगैरे मिळवून दिल्या. ही गोष्ट म्हैसूर गॅझेटियर तालूका काडूर पैकीं शृंगेरी शिलालेख नंबर १ वरून व्यक्त होते.

अक्षोभ्यतीर्थ व विद्यारण्य ह्यांचा द्वैताद्वैत निर्णयासाठीं वादविवाद झाला तेव्हां जयपराजयाच्या निर्णयासाठीं उभयपक्षांच्या सहमतानें वेदांतदेशिकाचार्यांची योजना करण्यांत आली होती. त्यांनीं अक्षोभ्यतीर्थांना—

" असिना तत्त्वमसिना परजीवप्रभेदिना ।
विद्यारण्यमहारण्यमक्षोभ्यमुनिरच्छिनत् ॥ "

असें निर्णयपत्र दिलें. ही गोष्ट " वेदांतदेशिकवैभवप्रकाश " नामक ग्रंथाच्या सत्तराव्या पृष्ठावर नमूद केलेली आहे.

मठांतील गुरुवंशपरंपरेप्रमाणें अक्षोभ्यतीर्थ शके ११६९ त

वृंदावनस्थ झाले असें म्हटलें तर विद्यारण्याशीं त्यांचा वाद झाल्याची गोष्ट संभवत नाहीं.

३ श्रीमन्मध्वविजयकथेमध्यें आचार्य व ईश्वरदेव नांवाचा राजा यांची भेट होऊन संभाषण झाल्याची हकीकत दहाव्या सर्गावरून कळून येते. हा राजा शके ११८२ पासून ११९३ पर्यंत महादेव या नांवानें देवगिरी ( दौलताबाद ) येथें राज्य करीत होता. हा यादवांच्या वंशांतला होता. आचार्यांची पहिली मध्वनवमी शके ११२० त झाली असें मानलें तर ही ईश्वरदेवाच्या भेटीची कथा उपपन्न होत नाहीं.

४ अनंतशयन व रामेश्वर या ठिकाणीं श्रीमदाचार्यांशीं वाद करून पराजित झालेले श्रृंगेरी मठाचे यति विद्याशंकरतीर्थच होत हें निश्चित आहे. श्रृंगेरीमठाच्या यतिपरंपरेवरून विद्यारण्यापूर्वी शंकरनामांकित यति विद्याशंकर हेच एक होऊन गेल्याचें दिसून येतें. हे यति त्या मठाचे अधिपति शके ११५० ह्या वर्षी झाले होते. मठांतील प्रसिद्ध गुरुवंशपरंपरापटांतील संवत्सराशीं हें संवत्सर विरुद्ध दिसतें.

सुप्रसिद्ध विद्वान् डॉक्टर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या पुस्तकावरून पुरातन वंशपरंपरेमध्यें विलंबि, पिंगल, रक्ताक्षि, श्रीमुख इत्यादि संवत्सरें मात्र आहेत, शकसंवत्सरें दिसत नाहींत असें कळून येतें. शकसंवत्सराची गणना अलीकडे केलेली दिसते. ह्यामुळें १२० वर्षें लेखांत चुकून पडलेलीं असावीं असें वाटतें. विद्याधिराजतीर्थ चौसष्ठ वर्षें, सत्यव्रततीर्थ ६३ वर्षें आणि रघुनाथतीर्थ ५८ वर्षें संस्थानचे अधिपति होते असें वंशपरंपरापटावरून

समजतें. यांत कोठें तरी चूक झाली असावी. ह्या एकंदर विवेचनावरून शिलालेख आणि विद्यारण्यांचा काल यास अनुसरूनच श्रीमदाचार्यांच्या कालाचा निर्णय करणें युक्त होय असें आम्हांस वाटतें. ऐतिहासिक पुरावे आणि गुरुवंशपरंपरा यांजवरून निघालेलीं विलंबि आणि पिंगळ हीं वर्षें अमान्य करणें प्रशस्त नाहीं व आवश्यकही नाहीं. कदाचित् शकसंवत्सराच्या गणनेंत चूक झाली असेल. तेव्हां आचार्य शके ११६० च्या विलंबिसंवत्सरांत जन्मले आणि शके १२३९ च्या पिंगळ संवत्सरांत अंतर्धान पावले असें ह्या उपपत्तीवरून दिसून येतें. महनीयांनीं या गोष्टीचा चांगला विचार करावा अशी प्रार्थना आहे.

श्रीकृष्णार्पणमस्तु.

हें चरित्रलेखन श्रीमध्वनवमी संवत १९७१ या पुण्य दिवशीं पूर्ण झालें.



## वै. वा. वे. शा. रा. रा. माधवाचार्य कानडे बांईकर यांनीं केलेल्या आरत्या.

### १ आरती दशावतारांची.

प्रलयांबुधिसंचरणा मीनाकृतिहरणा । सत्यव्रतसप्तर्षिप्रमुखैर्नुतचरणा । कच्छपवेशादरणा मंदरागिरिधरणा । सूकरपृथ्व्युद्धरणा दितिजासुरहरणा ॥ जय देव जय देव जय लक्ष्मीरमणा । नरहरिवेशाचरणा मयि ते खलु करुणा । जय देव जय देव ॥१॥ निजदासोक्तं सफलं कर्तुं निजधर्मा । सदसि स्तंभे दर्शितभीकृन्निजधामा । निजभर्त्सितनिर्भर्जितसुररिपुगदचर्मा । शरणागतजनरक्षण अर्पितदृढवर्मा । जय देव जय देव ॥२॥ लक्ष्म्यालिंगितगात्रा मुनिहृत्कजमित्रा । विधिभवसुरवरसन्नुतपदनखशशिमित्रा । दुर्जनदुर्गखनित्रा रक्षितरिपुपुत्रा । अश्वत्थांचितपत्रा कृतरक्षणसत्रा ॥ जय देव जय देव ॥३॥ वंदे सुरविधिदक्षं वामनकृतभिक्षम् । रामं क्षत्रियकक्षं हुतभुजामिवभक्षम् । रामं जानकिजायाकारणशरलक्षम् । कृष्णं धृतसुरपक्षं ध्वंसितारिपुपक्षम् ॥ जय देव जय देव ॥ ४ ॥ पाखंडीकृतवेषं दुर्जनमतिमोषम् । बुद्धं कल्किसुवेषं शरणागतपोषम् ॥ जय देव जय देव ॥ ५ ॥

### २ आरती नृसिंहाची.

हिरण्यकशिपुं हंतुं स्तंभेऽवतरन्तम् । भक्तं प्रणतं त्रातुं प्रल्हादं सततम् ॥ व्याप्तं सकलस्थावरजंगमभूतगतम् । दर्शितभवभयसंकटमपहर्तुं भंज तम् ॥ जय देव जय देव वंदे नरसिंहम् । पादांबुजयुगसेवकदूरीकृतमोहम् ॥ १ ॥ कडकडशब्दस्फोटितसकलं ब्रह्मांडम् । चटचटशब्द-

स्रावितसर्वांबुदपटलम् । घोरध्वनिभयचकितक्षुभितामितसिंधुम् । चलितस्फुटितस्फालितचलदिग्गजबंधम् ॥ जय देव जय देव ॥ २ ॥ नखतटघाटितपटुतरदैत्योदरविवरम् । रक्तस्रपितांतःस्रक्कृतशोभारुचिरम् ॥ कनकप्रभरुचिकेसरताडितघनवृंदम् । करुणापांगनिरीक्षणतारितजडमन्दम् ॥ जय देव जय देव ॥ ३ ॥ भीषणजिव्हाभीमद्युतिदंष्ट्राभयदम् । निजपदपंकजसन्नुतनिजभक्ताभयदम् । सदयं नृहरिं वंदे निजदासोद्धरणम् । शरणं करुणापूरितहृदयं भवतरणम् । जय देव जय देव ॥ ४ ॥ लक्ष्मीलक्ष्मालिंगितवक्षस्तटकमलम् । शमलं शमलं हंतुं दातुं बहुविमलम् । वंदे संद्रुतदोषं नागायतदोषम् । देवं कौस्तुभभूषं शयनीकृतशेषम् । जय देव जय देव ॥ ५॥ रत्नालंकृतसिंहासनगतनरसिंहम् ॥ किन्नरनिर्जरसिद्धासुरनरहतमोहम् । पादांबुजयुगसंगत दैत्यात्मजहृष्टम् । दृष्टापरया भक्त्या निखिलैर्हतदुष्टम् ॥ जय देव जय देव ॥ ६ ॥ ब्रह्माद्यैरपि चकितकलितांजालिपुटकैः । सेवितमनिशं भक्त्या संतोषस्फुटितैः । ऋषिभिर्वर्णितगाथं तोषितसुरयूथम् । वंदे निर्जरनाथं तारितरघुनाथम् ॥ जय देव जय देव ॥ ७ ॥

## ३ आरती नृसिंहाची.

प्रल्हादं निजदासं कृतवन्हिग्रासम् । विषगिरिपतनत्रासं अचलितपदभासम् । ज्ञात्वादितिजायासं त्यक्त्वा श्रीवासम् । स्तंभे चकार वासं भयदाट्टाहासम् ॥ जय देव जय देव जय जय नरसिंहा । मम हृत्काननचारणषड्वारणसिंहा । जय देव जय देव ॥ १ ॥ यस्मिन् गर्जति चण्डं सकलं ब्रह्माण्डम् । ब्रह्मा कलयति खण्डं पतितं करिगण्डम् । आखंडलकोदण्डं गलितं शशिखण्डम् । रविमंडलसत्कुण्डं कुण्डलभूखण्डम् । जय देव जय देव ॥२॥ यत्कोपानलदहनं संचारितगगनम् । हिरण्य-

कशिपुं स्वांके कारितवरशयनम् । ददार वक्षःसदनं करजैः सुरकदनम् ।
तद्रक्तांकितरदनं ध्यायेद्धरिवदनम् ॥ जय देव जय देव ॥३॥ लक्ष्मीः
पुरतो रूपं दृष्ट्वाखिलरूपम् । भीता जगाम रूपं धृत्वा हृदि कम्पम् ।
विरंचिरुङ्झितदर्पं तस्थौ न समीपम् । प्रल्हादं संप्रैषुः सकलासुरदीपम्॥
जय देव जय देव ॥४॥ दृष्ट्वा सुरपतितनयं निजपदि कृतविनयम् ।
ननंद देवः सदयं तत्केऽभयनिलयम् । न्यासे शंकरनिजकरमानंदितहृद-
यम् । माधवहृद्भवममयं दूरं कुरु सदयम् ॥ जय देव जय देव ॥५॥

## ४ केशवादिचतुर्विंशतिनामस्मरणार्तिक्यम्

वंदे केशवदेवं सुकचैरतिदेवम् । नारायणमतिजीवं उदरीकृतजीवम् ।
वारितमायागर्वं माधवमतिसर्वम् । गोविंदं सुरसेवं इंद्रियगणदेवं । जय देव
जय देव नृहरे लक्ष्मीशा । पूरितविधिगिरिशाशा अघटितघटनेशा ॥ जय
देव जय देव ॥ १ ॥ विष्णुं व्यापनरूपं प्रलयाम्बुचरिष्णुम् । धृतमधुसूदन-
रूपम् मधुकैटभघृष्णुम् । कृतत्रैविक्रमरूपं त्रिभुवनवर्धिष्णुम् । वामनका-
मदरूपं त्रैविष्टपजिष्णुम् ॥ जय देव जय देव ॥२॥ श्रीधरश्रीकरमूर्तिं
नाशितवेदार्तिम् । दामोदरशिशुमूर्तिं कृतमातृस्फूर्तिम् । जय देव
जय देव ॥ ३ ॥ संकर्षणविभुरूपं अरिकर्षणयूपम् । सुवासुदेवरूपं
विश्वोदककूपम् । प्रद्युम्नं हरिरूपं परितोऽखिलदीपम् । वंदेऽनिरुद्धरूपं
अम्बरवद्व्यापम् । जय देव जय देव ॥४॥ पुरुषोत्तमकृतवेषं क्षराक्षर-
शेषम् । सेवेऽधोक्षजवेषं अक्षजधीमोषम् । भीकरनरहरिवेषं दितिजा-
करशोषम् । अच्युतसुंदरवेषं अच्युतपदजोषम् ॥ जय देव जय देव
॥ ५ ॥ दुर्जनमर्दनकरणं सुजनं शशिकिरणम् । उपेंद्रमिंद्रावरणं
सर्वासुरहरणम् । हरिमार्तध्वानिकरणम् गजेंद्रमुद्धरणम् । कृष्णं गोकुल-
चरणं माधवहृच्छरणम् ॥ जय देव जय देव ॥६॥

॥ श्रीमध्वमुनिप्रतापाष्टकम् ॥

क्वचित्सुरांच्छास्ति सुरांगनाः क्वचित् ।
क्वचिच्च गंधर्वपतीनृषीन् क्वचित् ॥
क्वचित् पितृन्कापि नृपान्नरान् क्वचित् ।
शुभानयं मध्वमुनिः प्रतापवान् ॥ १ ॥
क्वचित् प्रभुं स्तौति समीक्षते क्वचित् ।
क्वचित्स्मरन्नृत्यति गायति क्वचित् ॥
क्वचित्तमाराधयतीश्वरं क्वचित् ।
नमत्ययं मध्वमुनिः प्रतापवान् ॥ २ ॥
क्वचिद्धरेर्जीवजडातिभिन्नतां ।
क्वचित्प्रभोस्सर्वगुणैश्च पूर्णताम् ॥
क्वचिच्च तस्याखिलदोषशून्यतां ।
वदत्ययं मध्वमुनिः प्रतापवान् ॥ ३ ॥
क्वचिच्च विष्णोरुरुचित्ररूपतां ।
क्वचिच्च मुक्ताखिलजीवसंतृताम् ॥
क्वचिच्च तस्याव्ययचिन्मयाकृतिं ।
व्यनक्त्ययं मध्वमुनिः प्रतापवान् ॥ ४ ॥
क्वचित्स्मृतीः कापि पुराणसंहिताः ।
प्रवक्ति सूत्रं क्वचिदागमोक्तिभिः ॥
क्वचिच्च धर्मं चरति क्वचिद्ब्रवी-।
त्ययं [ श्रुतिं ] मध्वमुनिः प्रतापवान् ॥ ५ ॥
क्वचिच्च चार्वाककणादगौतम- ।
प्रभाकराद्वैतितथागतादिकैः ॥

कृतं मतं युक्तिशतैर्विखंडयन् ।
विभात्ययं मध्वमुनिः प्रतापवान् ॥ ६ ॥
परान्पराभावयति क्वचित् क्वचित् ।
निजान्कथायां कुशली करोत्ययम् ॥
क्वचिद् बुधान्वैष्णवमार्गमागतान् ।
पुनात्ययं मध्वमुनिः प्रतापवान् ॥ ७ ॥
क्वचित्समस्तागमनिर्णयोदिताः ।
कृतीः कृती व्याकुरुते सभांतरे ॥
प्रहृष्टरोमा नृहरौ क्वचिन्मनो ।
युनक्त्ययं मध्वमुनिः प्रतापवान् ॥ ८ ॥
इदं प्रतापाष्टकमच्युतप्रिय–।
श्रुतिप्रतीतामलमध्वयोगिनः ॥
यतिस्तदीयोऽकृत वादिराज ।
उदारधीस्तस्य कृपाकलासये ॥ ९ ॥
॥ इति श्रीमन्मध्वमुनिप्रतापाष्टकं सम्पूर्णम् ॥

---

परिशिष्ट ( ब )

# श्रीमन्मध्वस्तोत्र.



स्वभावें जिवा स्वल्प नाहींच सत्ता ।
फळांतें शुभाशूभकर्मा न भोक्ता ॥
अनंता गुणीं व्याप्त तो शेषशायी ।
हरीभक्ति हें द्वैत दावी उपायी ॥ १० ॥ ( १ )
जो श्रीनिवास परिपूर्णगुणाब्धि जो का ।
विश्वोदयो स्थितिलयो करणार सो कां ॥
त्यासी समत्व मति ते अतिदूरि व्हावी ।
हे बुद्धि आश्रितजना गुरुमध्वधी वी ॥ ११ ॥ ( २ )
भार्या रमा सुत विधी पुरवैरि नातू ।
शक्रादि निर्जर जया परिवारभूतू ॥
ध्यानीं सदा मुनिजनीं प्रतिमा नमावी ।
तो वंदिजे निजजना गुरु मध्व दावी ॥ १२ ॥ ( ३ )
स्थापूनि भेद परिचिन्हित तप्तमुद्रा ।
मंत्रोपदेश तरवी ममतासमुद्रा ॥
तात्पर्यनिर्णय स्वाशिष्यजनोपकारा ।
केला कुवादमतमेघविनाशवारा ॥ १३ ॥ ( ४ )
व्यासें स्वशिष्य गुरुमध्व म्हणोनिशानें ।
वाळूस्वरूप प्रतिमा दिधल्या दयेनें ॥
होते सुवार्चन मठांत परंपरा ही ।
तद्दर्शनें भुवि पुन्हां जननादि नाहीं ॥ १४ ॥ ( ५ )

तारूनि विश्व स्वमताप्रति चालवीलें ।
शास्त्रें पुराण सकळांसहि मान्य झालें ॥
लावूनि भक्ति हरिची गुरुमध्व तो हा ।
विख्यात तो जगतिमाजि विराजतो हा ॥ १५ ॥ (६)
लक्ष्मीनिवास जगतीपति वासुदेवो ।
वैकुंठनायक भवाब्धिंधत नीरनावो ॥
कर्ता अनेक परिपूर्ण सुखैकभोक्ता ।
हा बोध निश्चित धरी तमराशिहर्ता ॥ १६ ॥ ( ७ )
सर्वोत्तमत्व हरि हें दृढ ज्ञान व्हावें ।
सम्यग्वरें उडुपिक्षेत्र नरें पहावें ॥
कैसें उपेक्षिल तया यति मध्वमूर्ती ।
अंगीकृतं सुकृतिनः परिपालयन्ति ॥ १७ ॥ ( ८ )
ब्रह्मादि देव हरि किंकरसें कळावें ।
त्या साम्यदैवत कुबोध कधीं नसावे ॥
हे बुद्धि निश्चित दया करि मध्वमूर्ती ।
अंगीकृतं सुकृतिनः परिपालयन्ति ॥ १८ ॥ ( ९ )
सत्त्वीं रजीं तमगुणीं जिव जन्मले ते ।
प्रेरी हरी तदनुसारिच वर्तले ते ॥
ज्याला जसाच अधिकार तशीच बुद्धि ।
अंतर्नियामक मनोगति सर्व सिद्धि ॥ ३० ॥ ( १० )
कृत्रीमता हरिपदीं अणुही न चाले ।
आज्ञा घडे तरिच हें तरुपान हालें ॥
ऐसा समर्थ प्रभु हा जिव सूत्रधारें ।
हें पाहिजे उमगलें गुरुच्या विचारें ॥ ३१ ॥ ( ११ )

कामादि षड्रिपु तया श्रवणें जिणावे ।
तृष्णा कुसंग विषयादिक दूर व्हावे ॥
मी कोण काय बुडतों लटक्याच भारें ।
हें पाहिजे उमजलें गुरुच्या विचारें ॥ ३२ ॥ ( १२ )
चौऱ्यांशिलक्ष जननें मरणेंचि होती ।
श्वानादि कुत्सित तनू धरणें फजीती ॥
दैवानुरूप नरवपू ( नृवपू ) हरिभक्ति सारें ।
हें पाहिजे उमगलें गुरुच्या विचारें ॥ ३३॥ ( १३ )
वांछा नको परवधू—परद्रव्य—ठायीं ।
वैराग्य हें कडकडीत धरीं स्वदेहीं ॥
दास्यत्व साधि समता न करूनि चारें ।
हें पाहिजे उमगलें गुरुच्या विचारें ॥ ३४ ॥ ( १४ )
आकाशवायुहुतभुग्जलभूमिमेळें ।
हे पंचभूतक तनू घडली दयाळें ॥
तो मुख्य वर्तवि हरी जिवसूत्रधारें ।
हें पाहिजे उमगलें गुरुच्या विचारें ॥ ३५ ॥ ( १५ )
राखों नका कलिवशें मनिं ऐक्यभावा ।
तो एकलव्य आणि पौंड्रिक वासुदेवा ॥
हें नेणतां [ विमल ] वैष्णव-मार्ग ज्ञानें ।
अंधंतमीं नियत सत्य कधीं न माने ॥ ३६ ॥ ( १६ )
यतिवर पवनाचा वेश मध्वाख्य दंती ।
कुमति कदलिरानें नास्ति केलीं दिगंतीं ॥
सुरवर उडुपेचा स्थापिला कृष्ण जेणें ।
नर सुर म्हणतां तो रौरवीं होय जाणें ॥ ३७ ॥ (१७)

वागार्चनीं विरचिली हरिदासपूजा ।
कर्ता अनंत प्रकटी करि तत्त्वबीजा ॥
हें साधिलें शतमुखें बहुता उपायें ।
तो तारिला यतिवरें गुरुमध्वरायें ॥ ३८ ॥ ( १८ )

हे श्लोक एकंदर ३८ आहेत. त्यांपैकीं १ ते ९ व १९ ते २९ असे वीस श्लोक सांपडले नाहींत. ते कोणाच्या संग्रहीं असतील किंवा कोणा संशोधकास सांपडतील तर ते त्यांनीं आम्हांस कृपा करून द्यावे ह्मणजे आम्ही पुढील आवृत्तींत प्रसिद्ध करूं.

---